कॉंटिनेंटल प्रकाशन : ५९

# जन्मखुणा

लेखक

अरविंद वि. गोखले




१९४७

अडीच रुपये

**अरविंद गोखले**

५३७, सदाशिव, पुणें २

**यांचे कथासंग्रह**

प्रकाशित

१ नजराणा

२ उन्मेष

३ जन्मखुणा

संकल्पित

१ प्रतिभाचिन्ह

२ तनुजा

# क था नु क्र म

# हरपलेलें काव्य

१

पांचमजली आणि पाचशें बिऱ्हाडे असलेल्या त्या गजबजलेल्या चाळींत एक अगदीं छोटीशी घटना घडली, अन् त्या इवल्याशा घडामोडीने सारी चाळ हादरून गेली.

शेवटच्या मजल्यावरच्या शेवटच्या खोलीतला इसम अचानक दार उघडून बाहेर खोलीबाहेर आला. कुठेही न बघता जिने उतरून तो खाली आला. अन् तसाच तिरीमिरीने बाहेर पडला.

अन् हें दृश्य पाहून सारी चाळ गडबडून गेली !

अनेक तर्कवितर्क सुरू झाले. आज पांच-सहा दिवस त्यानें खोलीचें दार उघडलें नव्हतें. बाह्य कोलाहलाला दाद न देतां तो कडी लावून अविरत घोरत होता. आणि आज सूर्य कलंडतो तोंच तो अचानक बाहेर पडला. कुणाला वाटलें, आयुष्याला वैतागून हा जीव द्यायला निघाला. कुणाला वाटलें, झालेल्या धिंडवड्यानें चिडून सूड घ्यायला सरसावला. कुणाला वाटलें, आपलें आयुष्य व्यवस्थित लावण्यासाठीं पोटापाण्याचा उद्योग शोधायला जात आहे. कुणाकुणाला कांहीं कांहीं वाटत होतें......

तो शून्य मनानें चाळ मागें टाकून जाऊं लागला. त्याला जरा बरें वाटलें. आजूबाजूचे उपदेश करणारे बुड्ढे लोक, टीका करणारे कारकुंडे अन् बोटें मोडणाऱ्या साळकायामाळकाया ह्यांच्यापासून दूर आल्यानें तो जरा प्रफुल्लित झाला. हळूहळू त्याच्या आयुष्यांतले इतर वैरीही मागें राहूं लागले. बिलें थकल्यानें असहकार करणारा दूधवाला, न्हावी, धोबी आणि तत्सम वर्ग; आगाऊ पैसे मागणारा खाणावळीचा लोभी मालक; भाडें वसूल करायला सोटा घेऊन दारांत ठाण मांडणारा भैया—सारें दूर टाकून तो झपाट्यानें जात होता.

मधून मधून त्याच्या नेत्रांसमोर त्याच्या बायकोची मूर्ति येई नि तो बावरून जाई. आज इतकीं वर्षें तिनें त्याला सोबत केली होती. त्याच्या-साठीं खस्ता खाल्ल्या होत्या. संसाराचा सारा भार निमूटपणें उचलला होता. अत्यंत गरिबी, नवऱ्याचा तऱ्हेवाईक स्वभाव ह्यानें ती गांजून गेली होती. आपलीं तीन पोरें सांभाळीत ती शिकस्तीनें त्याच्यासह जगत होती. पण अखेर तिलाही माहेरचा रस्ता पकडावा लागला होता...

आपल्या पत्नीची व पोरांची आठवण त्याला अनेकवार येई, नि त्याचें मन विषादानें भरून जाई. पण आज–आतां त्याला आपल्या बायका-पोरांची देखील आठवण उरली नाहीं!

अति वेगानें, अति उत्साहानें तो चालला होता.

नकळत तो टेकडीच्या माथ्यावर येऊन पोंचला.

त्यानें सभोंवार पाहिलें. दूरवर आकाश टेंकलें होतें तेथें रक्ताळलेलें सूर्यबिंब येऊन स्थिरावलें होतें. आजूबाजूच्या इमारती कांपलेल्या आकृत्यां-सारख्या दिसूं लागल्या होत्या. आकाशांत विविध रंगांचा शिडकाव होत होता. जागोजागीं चांदण्या उधळायला सुरुवात झाली होती. चोहोंकडून उन्मादक वारा घोंघावत होता नि तो विलक्षण उत्तेजक होता!

तो टेकडीवर उताणा पडून आकाशखंडाकडे पाहूं लागला. आपण अगदीं प्रफुल्लित वातावरणांत वावरत आहों, असें त्याला वाटत होतें. बायका-मुलांची आठवण बुजाली, देणेंकरी-दावेकऱ्यांच्या याद्या तो विसरला. ऐहिक जगांतले ते आत्मे एखाद्या दूर ठिपक्यासारखे अदृश्य होत चालले.

एखाद्या दोरा तुटलेल्या वावडीप्रमाणें आपण भिरभिरत कुठल्या तरी अनोळखी अन् नव्या जगांत जात आहोंत असें त्याला स्पष्ट वाटलें...

नवे आत्मे !—माधव जुलिअन्, तांबे, गडकरी, केशवसुत, शेली, बायरन्, ब्राउनिंग...अनेक नांवें त्याच्यापुढें फिरूं लागलीं. तींही हलके हलके पुसटलीं. अनेक पुढारी, अनेक लोकोत्तर पुरुष त्याला दिसले. अनेक इतिहास, अनेक अक्षर कृति, अनेक साक्षात्कार, अनेक क्रान्त्या...

त्याच्या मनांत कांहींच ठरेना. आपण एका पोकळींत वावरत आहोंतसें त्याला भासलें. हृदयांत अनेक कल्पनांना पूर आला आहे...डोक्यांत अनेक विचारांचें तांडवनृत्य चाललें आहे...ओंठावरून शब्दसृष्टीचे ईश्वर...

आपले तेजाळलेले डोळे घट्ट मिटून घेऊन तो समाधि घेतल्यासारखा पडून राहिला !

केती तरी वेळ तो तसा होता.

त्याला जाग आली. तो उठला नि तडक चालूं लागला. त्याचे पंचप्राण, पंचेंद्रियें एकाच दिव्य, भव्य, प्रचंड व उदात्त भावनेनें भारलीं होतीं.

गुणगुणत. भिरभिर पहात, हातवारे करीत तो कसा तरी घरीं पोंचला..

मध्यरात्र झाली होती. सारी चाळ स्तब्ध होती. सारें जग ओसाडलें होतें. ह्याच्या हृदयांत मात्र नवे सूर उमटत होते.

खुर्चीचे पाय मोडले होते. दिव्यांत तेल नव्हतें. तो तसाच अंधारांत एका कोंपऱ्यांत बसला. समोरचे कागद त्यानें पुढें ओढले, नि तो पेन्सिलीनें लिहूं लागला.

प्रतिभेला झालेल्या दिव्य साक्षात्कारानें सोन्याचे शब्द एकसारखे उतरवले जात होते. एकदांही तो थांबला नाहीं. एकदांही त्यानें वर मान केली नाहीं. एकामागून एक, अनेक कागद त्यानें लिहून काढले.

त्याचे सारे विचार, साऱ्या कल्पना, सारा संदेश, सारा दिव्य भाव त्या कागदांवर ओतला गेला.

मग त्यानें एक प्रदीर्घ सुस्कारा टाकला. अगदीं हायसें वाटलें त्याला. आयुष्यांतलें कर्तव्य केलें, एक अभिजात अन् अक्षर कृति निर्मिली, ह्याचा उदात्त आनंद त्याच्या चेहऱ्यावरून ओसंडत होता.

तेथेंच एका बाजूला तो कलंडला. त्याला अगदीं गाढ झोंप आली. इतकी शान्त व प्रसन्न निद्रा त्यानें पूर्वी कधीं अनुभवली नव्हती.

तो जागा झाला तेव्हां सूर्य धगधगायला सुरुवात होत होती. जगाचे व्यवहार सुरू होते. चाळींतला कोलाहल उच्च स्वरांत चाललाच होता.

त्यानें आनंदी वृत्तीनें डोळे उघडले. त्याच्या चेहऱ्यावर हास्य उमटलें. एका अक्षर अन् अमर काव्याला जन्म दिल्याच्या दिव्य जाणीवेनें त्याचें हृदय फुलून गेलें होतें. स्वतःच्या प्रतिभेचा, कर्तृत्वाचा त्याला अतोनात अभिमान वाटूं लागला...

हें काव्य आतां जगापुढें येईल. सारें जग विस्मित होईल. चोहोंकडे त्याचें तेज फांकेल. अनेक आवृत्त्या, अनेक रूपें, अनेक भाषांतरें! स्तुति होईल, अभिनंदनाचा वर्षाव होईल, बक्षिसांचा ढीग पडेल. ह्या युगांतला महान् कवि म्हणून आपलें नांव खोदलें जाईल.

...अन् ती आपणासाठीं झिजणारी पत्नी! तिचें नष्टचर्य संपेल. आपलीं अपत्यें जगांत मानानें जगतील...साऱ्या आयुष्याचे नकाशेच बदलून जातील. मग हा तगादा लावणारा पठाण, धोबी, न्हावी...अन् हीं चाळींतलीं कळकट खोकडें...

तो स्वतःशींच हंसला. त्या गोड, गोंडस, जागत्या स्वप्नांतून अलगत उठून त्यानें जवळच विखुरलेले ते अमर कलाकृतींचे अमोलिक कागद हातीं घेतले—

हृदयाशीं त्या कागदांना घट्ट घट्ट धरून त्यानें परमेश्वराचे आभार मानले नि तो अभिमानानें ते वाचूं लागला—

पण...

सारे कागद कोरे होते!!—

त्याचा चेहरा एकदम भकास झाला. डोळ्यांत प्राण आणून तो त्या कागदांकडे पाहूं लागला.

कागदावर कांहींसुद्धां लिहिलेलें नव्हतें !

त्याचें रक्त गोठलें, शिरा ताठरल्या, चेहरा पांढरा फटफटीत पडला. शून्य मुद्रेनें तो तसाच प्रेतवत् बसला.

उन्हाच्या तिरीपी दाराच्या फटींतून आंत घुसल्या; त्याचें शरीर जागोजागी तडकूं लागलें; मग तो उठला.

भेसूर हास्य करून, त्यानें जवळच पडलेली अन् शिसें नसलेली ती पेन्सिल उभी चिरली अन् ते दोन दुष्ट तुकडे खिडकीबाहेर फेंकून दिले.

आजूबाजूचे ते कोरे कागद गोळा करून तो खोलीबाहेर आला. पांचव्या मजल्यावरून त्यानें सभोंवार पाहिलें. नि मग हातांतल्या कागदांचे असंख्य छोटेछोटे तुकडे करून त्यानें ते खालीं उभ्या असलेल्या, न्हावी, धोबी, हॉटेलवाला, चाळीचा भय्या, आपला म्हातारा सासरा नि चाळींतली शिष्टमंडळी ह्यांच्या अंगावर भिरकावून दिले !

---

त्याच्या बोलण्यांत कांहींच तथ्य नव्हतें. कांहीं तरी गंभीर, नवीन नि चमत्कारिक ऐकायला मिळेल असेंच साऱ्यांना वाटलें होतें. बोलण्यापूर्वी त्यानीं जो आवेश आणला होता त्यानें आमची उत्सुकता अधिकच वाढली. त्या अबोल, सीध्या पण दांडग्या तरुणानें तें लवकर सांगावें म्हणून आम्हीं त्याच्या पाठीस लागलों; पण त्यानें जें गंभीर, नवीन नि चमत्कारिक म्हणून सांगितलें तें सारें अगदीं क्षुद्र, हास्यास्पद नि मूर्ख-पणाचें होतें. कोट्यांवर कोट्या करीत आम्हीं त्याची टर उडवली.

मला सुद्धां हंसूं लोटलें. पण त्याच्याकडे पाहतांच मीं तें आवरलें; अन् विचारांत पडलों. जणूं त्याचे डोळे म्हणत होते–अरु, तुला देखील माझे अनुभव नाहीं का विचार करायला लावीत ?—

मीं त्याच्याकडे पाहिलें. उण्यापुऱ्या उंचीचा नि ऐटीचा तो जवान होता. त्याची [illegible] अखंड हंसरेपणाची साक्ष देत होती. त्याचे डोळे उत्कट आ[illegible] होते. त्याची भरदार छाती निर्भयतेची निदर्शक होती. जी[illegible]ला. दुःखवैराग्याला दाद न देणारा निधड्या

पुरुष होता तो. अन् त्यानें असले हळवे विचार सांगावे ?—असले भावना-प्रधान विचार प्रकट करावे ?—मी खरोखरीच विचारांत पडलों.

सर्वजण गेल्यावर तो मजजवळ येऊन म्हणाला,

‘ कसला विचार करतोस एवढा ? ’

‘ तुझ्याबद्दलच ! ’

तो हंसून म्हणाला,

‘ उं ! त्यांत काय आहे ?—एक पहिलवान झुरळाला भिऊन पळाला होता, माहित आहे ना ? ’

आम्ही दोघेही हंसूं लागलों. पण तो लगेच गंभीरपणें म्हणाला,

‘ बाकी ते तीन अनुभव मला मुक्या मारासारखे वाटले हं ! मोठमोठ्या जखमा आनंदानें सहन करतां येतात रे !—पण अशा मनाला मुंग्या आल्या कीं.........’

त्यानें सांगितलेल्या प्रसंगांची मी उजळणी करूं लागलों.

× × ×

बरीच रात्र झाली. गप्पांना खण्ड पडणें शक्य नव्हतें. पण डोळे चुरचुरायला लागले म्हणून उठणें भाग पडलें. सिग्रेटी पेटविल्या नि आम्ही घराकडे निघालों.

तो मात्र ताजातवानाच होता. लहानपणीं नदीच्या पुरांत उड्या मारण्याच्या गंमती तो रंगवून सांगत होता. आम्ही मात्र त्याला ‘ हूं हूं ’ करीत नुसते चाललों होतों.

अखेर एका वळणावर तो थांबला नि म्हणाला,

‘ अच्छा बॉईज् , मी जातों इथून ’—आम्ही त्याला सोडायला तयार नव्हतों. मीं तर म्हटलें, माझ्याच घरीं झोंप म्हणून. दुसऱ्या एकानें रात्रभर ब्रीज खेळायची लालुच दाखवली. पेंगत्या नि दमलेल्या स्थितींत सुद्धां तो जावा असें कुणालाच वाटेना. पण त्याचें आपलें एकच म्हणणें—‘ किर्रर अंधार पडला आहे, रस्ता खूप लांबचा आहे. [illegible] अर्धा पाकिट पिवळा हत्ती आहे.’

अखेर तो गेलाच. तो जेथून वळाला त्या कोंपऱ्यावरील वडावर भूत असल्याची वदंता होती. त्यासंबंधीं गप्पा मारीत आम्हीं दुसऱ्या दिशेनें चालूं लागलों.

गडद अंधारांतलें एकाकी भटकणें हा त्याचा आवडता 'स्पोर्ट' होता. एकामागून एक सिग्रेटी पेटवीत, शीळ घालीत, तो मजेनें चालला होता.

अखेर तो घरापाशीं पोंचला. पायऱ्या चढतांना त्यानें सिग्रेटचें थोटूक टाकलें नि सहज वळून पाहिलें—तो भयंकर दचकला !

बराच वेळ त्याच्या मागून सावकाशीनें येणारें एक लंगडें रोगट कुत्रें त्याच्यापाशीं येऊन पोंचलें होतें !

तें कुत्रें पाहतांच तो भयंकर दचकला, अन् धांवतच खोलींत घुसला.

त्याचें त्यालाच कळेना आपण कां दचकलों तें ! पण त्या दाट अंधारांत, रुबाबांत अन् निष्काळजी वृत्तींत चालत असतांना एक लंगडें कुत्रें सारी वाट आपल्या मागें यावें हें त्याला कसेसेंच वाटलें......

× × ×

त्यानंतर दुसऱ्याच दिवशींच्या सकाळची गोष्ट.

तालमींतून तो परत चालला होता. विचार कुठें धांवत होते कोण जाणें, पण चालण्यांत मस्ती मात्र भरली होती. तालीम केल्याचा परिणाम असणार बहुतेक.

रस्त्यावरची रहदारी वाढत होती. पर्वतीला जाणारे पेन्शनर्स परतत होते. सायकलवाल्यांची संख्याही वाढत होती. मध्येंच एक टांगेवाला भरधांव वेगानें त्याच्या पुढून गेला. पुणेरी टांगा इतक्या जोरानें गेलेला त्यानें पहिल्यानेंच पाहिला. तो स्वतःशींच हंसला नि झपझप चालूं लागला.

तो वळला त्या ठिकाणीं, त्याच वेळेला विरुद्ध बाजूनें एक व्यक्ति येत होती. ती आपल्या अंगावर जोरानें आदळणार असें त्याला वाटलें. निमिषमात्रांत त्यानें आपला शरीराचा उजवा भाग मागें नेला व धडकी देण्याची तयारी केली.

......एक क्षणार्धाचाच अवधि होता. पण त्यानें समोर निरखून पाहिलें. अन् तो चटकन् बाजूला झाला......

तो एक आंधळा होता ! !

त्याची मस्ती एकाएकीं उतरली. पांचशें जोर काढणारे आपले दण्डाचे स्नायु गळून पडत आहेतसें त्याला वाटलें. त्याचीं पावलेंही जड पडूं लागलीं.

तो घरीं आला नि खुर्चीवर बसून घाम पुसूं लागला.

आपल्या सरळ नि निर्भय मनाला हे काय चमत्कारिक धक्के बसतात त्याला कळेना.

× × ×

अन् तिसरा जोराचा धक्का संध्याकाळीं बसला.

'लकी'मध्यें 'पावणा' पीत तो समोरच्या कांचेंतून बाहेर पाहत होता. नेहमींचेंच दृश्य. टोळयाटोळ्यांनीं उभे असलेले कॉलेज तरुण, इतस्ततः उगाचच भटकणाऱ्या त्यांच्या जीविताच्या आदर्श असलेल्या कॉलेज-कुमारिका, मध्येंच विनाकारण आलेल्या पाढऱ्या केंसांप्रमाणें पांढऱ्या केंसांचे पेन्शनर्स—नेहमींचेंच दृश्य; पण तो तें बराच वेळ पाहत होता.

अखेर त्यानें आपली दृष्टि आंत वळवली.

शेजारच्या टेबलावर तीन तरुण काय मागवावें ह्याची जोरकस चर्चा करीत होते. त्याच्या पलीकडे असलेल्या स्पेशल रूममध्यें एक जोडपें नसलेलें जोडपें हळूच शिरत होतें. अन् त्याच्या बाजूच्या टेबलाशीं—

काय आश्चर्य ?—

त्यानें निरखून पाहिलें. चेहरा वळवला असल्यानें नीट दिसणें शक्य नव्हतें. पण कोटाचा रंग, मानेचा बांक नि भुरे, विखुरलेले केंस—शंकाच नको. तो त्याचा जुना स्नेही श्रीनिवास होता !

तो किंचित्सा उठला नि श्रीनिवास म्हणून जोरांत हांक सुद्धां मारणार होता.

पण तो मटकन् खालीं बसला. त्या माणसाकडे पुन्हां पाहणेंही त्याला अशक्य वाटलें. तो बाहेर पाहूं लागला. नेहमींचेंच दृश्य, कांहीं देखील बदल नव्हता.

बऱ्याच वेळानें त्यानें आंत पाहिलें. तें टेबल रिकामें होतें.

त्यानें एक सुस्कारा सोडला. काय विलक्षण साम्य !—श्रीनिवासला मरून आज दोन वर्षें लोटलीं होतीं. तोच श्रीनिवास इथें कसा असेल ??—

× × ×

त्या रात्रीं त्याला झोंप आली नाहीं. दुसरा दिवसही असाच वायां गेला. विचार, आश्चर्य, स्वतःशीं हंसणें, चमत्कारिक वाटणें, नाना तऱ्हेचे भाव. त्याला कांहींच सुचेना. संध्याकाळीं खडकी अर्सनेलची हॉकीची फायनल होती; पण जावेंसेंच वाटेना त्याला. रात्रीं अकिन् टमरॉफचें सुंदर पिक्चर होतें; पण आपल्या त्या आवडत्या नटाची आठवणही त्याला राहिली नाहीं.

अखेर त्यानें आम्हांला हें सारें सांगितलें. आम्हीं त्याची कोण टर उडवली. अशा बाबतींत त्याचा माझ्यावर भरंवसा. मीं त्या प्रसंगांची मनाशीं उजळणी केली. पण सारें हास्यास्पद वाटलें.

इतकेंच वाटलें मात्र, कीं जग ही कांहीं नुसतीच समरभूमि नाहीं !

## मांसाचा गोळा

## ३

मावळती झाल्याबरोबर जड मनानें नामा आपल्या खोपटांत शिरला. कोपऱ्यांत त्याची बायको कुडकुडत खिन्नपणें बसली होती. तिच्याकडे दृढ दृष्टीनें पाहत तो म्हणाला,

" पारु, छोकरीला इकडे दे–तिला आज विकून टाकायची."

त्या विखारी वाक्यानें पारूचें हृदय चिरलें गेलें. विद्ध नजरेनें नवऱ्याकडे पाहत तिनें रकट्यावर पडलेल्या आपल्या लहान मुलीला घाईघाईनें छातीशीं गोळा केलें.

रुद्ध आवाजांत नामा पुन्हां म्हणाला,

"—पोरीला इकडे दे– तिला आज विकायची—"

पारूचें सारें शरीर थरथरलें व ती पिचलेल्या आवाजांत उद्गारली,

"—देवा ! "

पण ती लगेच मूक झाली. देवाला आळवण्याचा काळ संपला होता.

दुष्काळाचे दिवस सुरू झाले होते. रोज उपासमार होत होती. प्रयत्न करून, हिंडून, भटकून, तोंड वेंगाडून, अन्नाचा कणही दिसत नव्हता.

वाढत्या न् सतत भुकेनें शरीर खंगत चाललें होतें. रक्ताचें पाणी झालें होतें अन् अश्रू आटून गेले होते. आजूबाजूचीं माणसें पाहतां पाहतां पटापट प्राण सोडत होतीं. माणसाची माणसाला मदत मिळत नव्हती. आणि देव धांवून येत नव्हते !

. पारू मूक झाली. तिला कांहीं सुचेना ! गेले पांच दिवस कुणाच्याच पोटांत अन्नाचें शीत गेलें नव्हतें. जिभेला कोरड पडली होती अन् तोंडाची चव लोपली होती. कांहीं दिवसांपूर्वी एक उष्टी पत्रावळ अर्धवट चाटायला मिळाली होती, त्याची अस्पष्ट आठवण होती. बाकी कसली कसलीही स्मृति शिल्लक नव्हती. अन्न, अश्रू, आनंद, आपलेपणा...

पण काल एक नवी गोष्ट समजली होती. ती गोष्ट कुणाला सांगण्यासारखी नव्हती; कुणी ऐकण्यासारखी नव्हती. अंधारा आडोशाला, चोरून-मारून, सभ्य न् श्रीमंत गणल्या जाणाऱ्या जगात व्यवस्थितपणें घडणारी ती गोष्ट—तो व्यवहार ! तो ऐकून साऱ्या भावना उफाळून आल्या. अन्न, अश्रू, आनंद,–अन् आपलेपणा देखील !

त्याच आपलेपणाच्या आगीनें पारूनें आपल्या पोरीला छातीशीं कवटाळलें. तिच्या शरीरांतून निर्माण झालेला हा तुकडा, हा हाडामांसाचा गोळा ! हा भाकरीच्या तुकड्यासाठीं विकायचा ?—पारूची क्षीण, क्षयी काया थरथरली. तिला स्वतःच्या पोटाची शरम वाटली. ज्या पोटात हा जीव रुजला, वाढला, त्या टीचभर खळींत अन्न भरण्यासाठीं आतां हा सौदा करायचा !—तिला आपल्या निर्जीव स्तनांचा संताप आला. ह्या तडफडणाऱ्या एकुलत्या एक छकुलीला दुधाचा थेंब पाजण्याइतकीही अवस्था उरली नव्हती त्यांची. ही विटंबना पेटत्या डोळ्यांनीं पाहणारे आपले असहाय डोळे तिनें मिटून घेतले.

नामा तिच्या नजीक आला. तिच्या राठ बुचड्यावर हात ठेवून मृदुपणें तो म्हणाला,

" असं काय पारू ! आज पोरीला विकायचं ठरलं आहे ना आपलं ?—कालच आपण बेत केला आहे. मारवाड्याच्या दुकानाशेजारीं तो लठ्ठ इसम लहान मुलींना विकत घेतो. चार सहा आणे सहज देईल तो ! किती

तरी जणांनीं आपलीं कच्चींबच्चीं विकलीं. शेजारच्या माळकऱ्यानें तर भीक मागतां येईल इतक्या वयाची पोरगी एक रुपयाला विकली—"

नवऱ्याचा स्नेहपूर्ण स्पर्श व शांत स्वर ऐकून पारूनें डोळे उघडले. पण तिच्या हृदयांत उठलेला कल्लोळ कमी झाला नाहीं. छातीशीं धरलेला तो जीव दूर करावासें वाटलें नाहीं. अन्न मिळवण्याचे सर्व उपाय संपले, सर्व आशा संपली, तेव्हां नामानें नि तिनें निर्णय घेतला. पोटांतला भस्मासूर शमवायला कांहीं तरी करायला हवें होतें. आजूबाजूचीं माणसें काय करीत होतीं हें दिसत होतें. कुणी आपल्या आयाबहिणी पाठविल्या, कुणी कच्चींबच्चीं फेकून दिलीं. डोळयांत घोटाळणारे प्राण निघूनही जात नव्हते. नामानें गुलामासारखें राबायचें पत्करलें असतें, पण त्याची कुणाला जरूरी नव्हती. पारूनें स्वतःचें शीलही कुणाच्या स्वाधीन केलें असतें, पण त्या निस्तेज, क्षयी बाईकडे कोण पाहणार ?—स्वतःजवळ होतें तें सारें फुंकून टाकायला ते सिद्ध होते. त्यांचा एकुलता एक विसांवा-तो पांचसहा आण्यापर्यंत घ्यायला मात्र एकजण तयार होता !......

पारू अशीच विचार करीत शून्यपणें बसली असती. पण तेवढ्यांत नामा पुढें झाला अन् छातीशीं धरलेल्या त्या पोटच्या गोळ्याला त्यानें हात घातला.

पारू विलक्षण दचकली. कशीबशी ती म्हणाली,

" हें काय—? "

तिनें नवऱ्याकडे डोळे फाडून पाहिलें. हा इतका कठोर, इतका क्रूर कसा झाला, तिला समजेना !

नामा म्हणाला,

" दे-आण तिला इकडे ! अंधार पडला आहे-खरेदीला सुरुवात झाली असेल ! आठदहा आणे मिळतील. चुरमुरे आणीन पैशाचे ! का भजीं आणूं ? काय आवडतं तुला ?-"

कधीं नाहीं तीं आसवें डोळयांत वेगानें जमा झालीं. चुरमुरे-भजीं, उष्टंमाष्टं, कांहीं तरी पोट जाळायला हवं आहे-मूल विकायलाच हवं आहे ! मूल नको, पति नको, स्वतःचें शील नको-कांहीं नको-तें अन्न कुठें

आभाळांत दडलें तें हवें आहे ! हीं पिळवटून गेलेलीं आंतडीं अन् ही भुकेनें लोंबूं पाहणारी पडजीभ ! पारू ओक्साबोक्शीं रडूं लागली.

नामानें पोरीला काढून घेतलें. रकट्याचा तुकडा उचलला अन् त्यांत तिला गुंडाळलें. उघडया डोळ्यांनीं पारू पाहत होती. पाहतां पाहतां तिला एक विचार सुचला. अधीरतेनें ती म्हणाली,

"–आजचा एक दिवस राहूं दे तिला–फक्त आजचा दिवस ! !"

तें ऐकतांच नामा विकटपणें हंसला. म्हणाला,

" डोकं फिरलं काय तुझं ? पोरटी दोन तासांवर जगेलसं दिसत नाहीं. निपचीत पडली आहे. काय देणार आहेस तिला ? हीं स्तनं तुझीं—पोरीनं कळवळून, चिडून चावून टाकलीं आहेत. तुझ्या ओंठावर लाळदेखील उरली नाहीं पोरीच्या तोंडांत घालायला !—"

खोपटाचें दार उघडून नामा घाईघाईनें बाहेर पडला व अंधारांत हळू-हळू दिसेनासा झाला !

नवऱ्याच्या त्या काळ्याकभिन्न आकृतीकडे पारू भकासपणें पाहत राहिली. तो दिसेनासा झाला तेव्हां ती बावरली. वेडयागत इकडे तिकडे पाहूं लागली. झोपडींत आतां फक्त एक फुटकी थाळी शिल्लक होती. दुसरें कांहीं उरलें नव्हतें !–सारें संपलें होतें !—

पारूला त्या जागीं बसवेना. तिला रडूं येईना. उठायची शक्ति सरली होती. तिला स्वतःचीच भीति वाटूं लागली. तिनें आपलें डोकें गच्च धरून ठेवलें. कसें तरी अवसान आणून ती उठली अन् तिरीमिरीनें घराबाहेर पडली.

वाट फुटेल तिकडे ती बेभानपणें जाऊं लागली. खांचखळग्यांतून, बोळा-अंधारांतून ती सुन्नपणें जात होती. भिकाऱ्यांची वस्ती मागें गेली. भूक भूक करीत वळवळणारे असहाय्य जीव अदृश्य झाले. सभ्य न् श्रीमंत लोकांच्या बंगल्याबंगल्यानें ती पुढें गेली. ह्या घरांतून धान्याचीं कोठारें भरलीं होतीं. घरांचीं गोकुळें झालीं होतीं. अन् गलेलट्ठ माणसें करपट दीर्घ ढेंकरा देत होतीं. त्या जगाबद्दल पारूला कुतूहल होतें–अन् संतापसुद्धां ! पण सूडाचे सारे विचार विसरून ती शून्यपणें पुढेंच चालली होती.

माळरानावर जिकडे तिकडे सैनिकांची छावणी पसरली होती. ह्याच हिरव्या राक्षसांनीं ही उपासमार आणली अन् अब्रू लुटून नेली. त्या नराधमांच्या क्रूर नजरेची यादही तिला उरली नव्हती. ती तशीच पुढें चालली होती—चालली होती !

पण असें चालून तिला भोंवळ येऊं लागली. पायांत गोळे आले. खपाटीला गेलेलें पोट आंतडीं बाहेर ओकणारसें वाटूं लागलें. भकास झालेलीं बुबुळें फाटणार असें वाटूं लागलें. तिचा तोल जाऊं लागला. ती थबकली. सभोंवार पाहिलें, तों किर्रर्र अंधार पसरला होता. माणसांचें अस्तित्वही आसपास नसावें. सर्व शुकशुकाट ! तें वातावरण पाहून पारू पार घाबरून गेली. आपण कुठें आलों, कसें आलों कळेना !

आपल्याला काय झालें आहे हें तिला कळेना. चालण्याची शक्तिही उरली नव्हती. जवळच एक छोटें देऊळ दिसलें. ती कशीबशी देवळाजवळ आली. हें वाळकें शरीर इथेंच टाकून द्यायचें, पुन्हां जाग आली कीं परतायचें ! देवळाच्या कट्टयाला ती टेकली अन् तिनें डोळे मिटले !

पण दुसऱ्या क्षणींच तिनें साफ डोळे उघडले. दचकून, डोळे फाडून, तिनें शेजारीं पाहिलें. तिच्या हाताला कसलासा स्पर्श झाला होता. पारूनें निरखून पाहिलें. त्या अंधारांतही तिला दिसलें. तिनें ओळखलें. मांसाचा गोळा !

एका जाड फडक्यांत गुंडाळून कुणी तरी एक लहान पोर तिथें टाकलें होतें !

पारूनें त्या अर्भकाला उचललें. किती तरी वेळ ती सताडपणें पाहत होती. छोकरा गुटगुटीत होता. तिला सुचेनासें झालें. अन् मग एकदम याद आली !—मारवाड्याच्या दुकानाशेजारचा तो लठ्ठ इसम ! सहा आण्याला पोरगी. सहा आणे !—दोन पैशाचे चुरमुरे, पैशाचीं भजीं...भूक शमवायला सारींच आपलीं पोरें विकतात ! पारूचे ते दमलेले, दुखलेले डोळे पेट घेऊं लागले. पांढरट ओठ तिनें दातांनीं चावले. अन् श्वास रोखून ती आपले पंजे त्या बालकाच्या नरड्याकडे नेऊं लागली.

“ ट्यहं-ट्यहं—” मुलानें रडायला प्रारंभ केला. सारी शांतता विस्कळून गेली. देवळांतला कुणी पुजारी ओरडला,

"ए बये-! काय कटकट लावली आहेस ?—जा घेऊन आपल्या पोराला—"

भीतीनें पारूनें त्या मुलाला उचललें, छातीशीं धरलें अन् ती धांवूं लागली.

सुकलेल्या स्तनांची अस्पष्ट ऊब लागतांच तें पोर रडायचें थांबलें; पाय हालवूं लागलें; अन् ओठांचा चाळा करूं लागलें.

पारूची धांवण्याची गति कमी झाली. तिच्या मनांत विचारांचा वेग वाढला. उत्साहानें ती झपझप चालूं लागली. बिलगलेल्या त्या पोराचा चाळा चालूच होता. किती लबाड पण !—जरा घेतलं कीं थांबला. खेळकर आहे गुलाम !—अन् खोडकरदेखील. बिचाऱ्याला कुणी तरी उघड्यावर टाकून दिलें होतें !—अरेरे, कसें वाऱ्यावर सोनें पडलें होतें–बिचारं माझं–हो माझं...माझं...

पारूचें हृदय भरून आलें. विचाराच्या आवेगांत ती पुटपुटूं लागली. बोबडें बोलूं लागली. थांबून, वांकून, मुलाचे पटापट मुके घेऊं लागली. माझं बाळ तें ! माझं बाळ... !

सैनिकांची छावणी मागें पडली. श्रीमंतांचीं गोकुळें मागें गेलीं. भूकबळींच्या रांगांतून ती झपझप आपल्या खोपटाकडे जाऊं लागली...

—पण पारू मध्येंच थबकली !

ती दचकली, बावरली. तिचा आवेश ओसरला. वात्सल्य विरून गेलें. आपली पोटची पोरगी आजच विकली ह्याची स्मृति तिला झाली ! आपल्या अंगावरचें लोढणें आपण फेंकून दिलें. आपल्या नवऱ्यानें पत्तराच्या हृदयानें तें कठोर कृत्य केलें ! पोरीची कटकट गेली, पैसे आले, भूक शमली, जीव वांचला—ह्या विचारानें तो खोपटांत आपली वाट पाहत असेल ! अन् आपण हा जीव घेऊन...

पारूच्या अंगावर सर्कन् कांटा उठला. तिचें पाऊल मागें पडेना. तिची नजर समोर जाईना. पुन्हां ती विचारांच्या वणव्यांत सांपडली.

पण पुन्हां तिनें अवसान आणलें. उपासमार, शीलभ्रष्टता, स्वतःच्या पोराची विक्री—ह्याखेरीज आणखी कोणतें मोठें संकट असणार या जगांत ?—पारूनें निश्चयानें पुढें पाऊल टाकलें.

खोपटाच्या दारापाशीं नामा शून्यपणें बसला होता.

पारूच्या जिवाचा चोळामोळा झाला. नामाला काय वाटेल ? हा जीव आणून त्रासांत भर पडणार आपल्या ! कदाचित् हें पोरही विकून नामा पैसा करील !—त्या बालकाला हृदयाशीं घट्ट धरीत पारू हलकेच पतीच्या पुढ्यांत आली.

नामानें तिच्याकडे गंभीरपणें पाहिलें. तिच्या हातानें वेढलेला तो गोळा पाहिला. अन् तो पाहतांच त्याची नेहमीची गंभीर नजर चाळवली गेली. भल्या मोठ्या प्रश्नांकित मुद्रेनें तो वेड्यासारखा तिच्याकडे पाहूं लागला ! !

ती नजर पारूला नवी होती. हा असा काय आ वासून बघतो आहे ? तिला गुदमरल्यागत झालें. तिनें अजीजीनें तें पोर समोर धरून म्हटलें,

" —हें बघ–कसा गुटगुटीत आहे !—हा छोकरा मला सांपडला. देवानें पाठवला हा आपणाकडे ! ह्याला टाकायचा नाहीं–विकायचा नाहीं ! मी ह्याला सांभाळीन–माझं रक्त पाजून पोशीन ! रागावूं नको–असं वेड्या-गत बघूं नको ! ह्याला आपल्या घरांत येऊं दे !—"

थक्क झालेली नामाची नजर बदलली नाहीं. अखेर तो कसेंबसें म्हणाला,

" पारू–आंत चल ! "

आवंढा गिळून नामा उठला अन् दार उघडून खोपटांत आला. त्याच्या मागोमाग पारू त्या पोराला घेऊन आली.

खोपटांतल्या कोपऱ्यांत रकट्याच्या तुकड्यावर त्यांची पोरगी निजली होती; तिकडे बोट दाखवीत नामा उद्गारला,

"—ती बघ आपली पोर ! मीं परत आणली ! मला विकायचा धीर नाहीं झाला !...आपण ह्या एकुलत्या एक छकुलीला देऊन टाकायला गेलों—आतां हीं दोघं घरांत आलीं. हीं दोघं आपलीं आहेत !—भुकेनं मरायचं असलं तर सारीं एकदम मरूं !—आज मात्र भूक भागली—! "

रकट्यावर पहुडलेल्या आपल्या पोरीकडे आसासून पाहतांना पारूनें हातांतला जीव कवटाळून घेतला. कसलेसे टपोरे अश्रू तिच्या त्या शिणलेल्या नेत्रांत चमकूं लागले. ती झोपडी आतां सर्वतोपरीं परिपूर्ण दिसूं लागली. अन्न, अश्रू, आनंद अन् आपलेपणा !...

---

# हें मन ! ४

कुलाबा.

ए रूटची बस कुलाबावाडीजवळ हंसगतीनें आली. वरच्या मजल्या-वरच्या लेफ्टनंट प्रेमसिंगनें डोकावून खालीं पाहिलें. स्टॉपजवळची रांग अगदीं तोकडी होती. एकदोन टॉमीज्, दोन कोळणी, एक लठ्ठ पारसीण अन् नंतरच ती महाराष्ट्रीय मुलगी. उमा रणदिवे. प्रेमसिंगनें वरून हलकेच खूण केली. मुलीनें वर पाहिलें नि मंद स्मित केलें. थोड्याच वेळांत ती वर येऊन प्रेमसिंगाजवळ बसली.

घंटा घणघणली व बसनें पुढें झेंप टाकली. बसच्या धक्क्यानें उमा रणदिवे प्रेमसिंगाच्या जवळ सरकली गेली. तिचा उघडा उजवा हात प्रेम-सिंगाच्या हाताजवळ आला आणि तिच्या केसांच्या वळणा त्याच्या गालावर रुळूं लागल्या. प्रेमसिंगाच्या वृत्ति बहरून आल्या. त्याच्या डोक्यांत विचा-रांचा वणवा पेटला. अंगावर रोमांचाचें रान उठलें. चोहोंकडे प्रेमाचा फुलबाग पसरला आहे, असें त्याला वाटलें. मघांचचें हास्य, आत्ताचा स्पर्श अन् त्यापुढचा सहवास ! प्रेमसिंगला वाटलें हें आतां रोजचेंच झालें. आज पुढची पायरी गांठली पाहिजे !...

रीगलपाशीं गाडी थांबली. अपोलो बंदरावरून सममुद्रावरचा सायंवारा सुटला होता. त्याचे झोत प्रेमसिंगाच्या अंगावरून गेले. दर्यावरील मादक जीवनाच्या हजारों आठवणी त्या झुळकीसह आल्या. बेफाम समुद्रांत दिवसभर आरमारांतली नोकरी करायची आणि उरला वेळ गांवांत बेताल-पणें घालवायचा. नेव्हींतल्या या नव्या नोकरीनें त्याचें आयुष्यच बदलून गेलें होतें. गुजराणवालांतलें तें साहसशून्य व दगदगपूर्ण जीवन, संसाराची ठराविक कटकट, शुष्क व संकुचित जग सारें समुद्रांत पार बुडून गेलें. आतां ग्रीन्समध्यें मद्याच्या पेल्यांत तरंगणारे क्षण, चिनी काफेंतलें जेवण, कफ्‌परेडवरच्या रम्य रात्री अन् कांहींच उद्योग नसेल तेव्हां रीगलच्या चौकांत एखादी भोळी छोकरी गवसते का हें पाहत घिरट्या घालणं......

मुझिअम् मागें टाकून बस पुढें गेली तेव्हां उमा रणदिवेनें विचारलें,

'माहिमला जाणार ?—'

'हं ! कदाचित् तुमच्याबरोबर दादरला उतरीन. आज तशी घाई नाहीं खोलीवर जायची. माझे दोघे सोबतीही आतां घरीं नसणार. कुठें तरी, कुणाच्या तरी, सहवासांत वेळ काढायचा—'

प्रेमसिंगाच्या ह्या लाघवी भाषणाला उमा रणदिवेनें उत्तर दिलें नाहीं. प्रेमसिंग किंचित् निराशला. तिला आपला आशय उमगला नाहीं असें त्याला थोडेंसें वाटलें. मराठी मुली युरेशियन पोरींसारख्या चतुर नसतात—पंजाबी स्त्रियांसारख्या मोकळ्या नसतात—असें त्याला वाटलें. नेव्हल अका-उंटस्‌मधल्या शिर्केंची सूचना त्याला आठवली. शिर्के म्हणाला होता, महाराष्ट्रीय मुली एकदां लोभावल्या म्हणजे सर्वस्व वाहतील; पण त्या लोभावणेंच महा कठीण आहे !—

प्रेमसिंगनें उमाकडे पाहिलें. त्याला शिर्केचें हंसूं आलें. बसमधल्या रोजच्या भेटींनीं तिची ओळख झाली होती. ओळखीची नजर, स्मित हास्य, गुड ईव्हिनिंग, बसा—इथं जागा आहे—माहिमलाच जाणार ना ? अन् मग सटर फटर गप्पा !—किती भरभर ओळख वाढली होती ! अजून एक पैदेखील खर्च केली नव्हती तिच्यासाठीं ! अगदीं फुकटांत आणि अगदीं लवकर ही पोरगी ताब्यांत येणारसें प्रेमसिंगाला वाटलें.

त्यानें म्हटलें,

'—बहुतेक शिवाजी पार्कला उतरीन. तुमचं घरही पाहतां येईल. रोज नुसतं बसमधून अर्धा तास बरोबर जाणं पटत नाहीं बुवा आपल्याला.'

उमा उत्तरली, ' मग या कीं !—'

नेहमींप्रमाणें ती अधिक बोलली नाहीं. पण ती ' या ' म्हणाली ह्याचा प्रेमसिंगला आनंद वाटला. स्वतःबद्दल अभिमानही वाटला. तिनें आढेवेढे घेतले असते तरी त्याचे बेत ठरले होते. तिला आपल्याच खोलीवर चलायचा आग्रह करायचा. तेंही नाहीं जमलें तर थिएटरें आहेतच. सारे मादक मार्ग उन्मादाच्या उद्यानांतच जाणारे होते !......

बस कोटांतून रस्ता कापीत होती. ॲस्क्विथ ॲंड लॉर्डस् , व्हाइटवे लेड्लॉ, इव्हान्स फ्रेझर–दिमाखदार दुकानें दुतर्फा उभीं होतीं. रंगीबेरंगी पातळें नि गिर्रेबाज झगे नेसून आकर्षक ललना हिंडत होत्या. मोटरींची नि माणसांची एकच गडबड उडालेली होती. थाटामाटाचीं दृश्यें सर्वत्र दिसत होतीं. त्या वैभवशाली राजरस्त्यानें उमा नि प्रेमसिंग विहार करीत जात होतीं.

बोरीबंदरच्या नाक्यावर एकच तोबा उडाला होता. मधल्या बेटांत ट्रामची एकच धांवपळ चालली होती. स्टेशनकडे लोकलसाठीं लोक धांवत होते. प्रेमसिंगाच्या डोक्यांत अनेक विचार गडबड करून राहिले होते. मध्येंच उतरून एखाद्या हॅाटेलमध्यें चलण्याचा आग्रह अजून साधत नव्हता. बसमध्येंही अधिक गप्पा नि अधिक लगट जमत नव्हती. आतां घरीं शिरकाव झाला कीं काय करतां येईल ह्याचा तो विचार करूं लागला.

बसनें बोरीबंदर सोडलें. प्रेमसिंगचे बेत जोरानें धांवूं लागले. लग्नाचें अगर तत्सम बोलणें कसें टाळत राहायचें, तिच्या घरीं कसें वागायचें, तिचा विश्वास बसेल असें धोरण कसें ठेवायचें–एक ना अनेक !—टाइम्स छापखाना, सिडनॅहम्स कॉलेज, आर्टस स्कूल–बसनें क्रॉफर्ड मार्केटचें वळण गांठलें.

मार्केटमध्यें मांडलेलीं रसरशीत नारिंगें नू सफरचंद पाहत प्रेमसिंग म्हणाला,

'बाकी ह्या योगायोगाची गंमत वाटते हं !–बसमध्यें रोज भेटतों म्हणून आपली ओळख झाली न् ती सारखी वाढतच गेली. बसमध्यें कमी का लोक भेटतात–अन् कमी का ओळखी होतात ?–पण आपली ओळख दृढ व्हायला कांहीं तरी दैवी कारण असावं !–तुम्हाला काय वाटतं–?–'

मोठें वळण घेतांना बस जरा तिरकी झाली. त्याचा फायदा घेऊन प्रेमसिंग उमाजवळ थोडासा सरकला. 'मोसा ओमर'च्या दुकानांतील नाजूक कांचपात्रांकडे पाहत उमा उद्गारली,

'—कुणाला ठाऊक !–मला मात्र तुमच्यासारखा सन्मित्र लाभला हें सुदैव वाटतें—'

ह्या उत्तरांत लडिवाळपणा होता कीं नाहीं हें प्रेमसिंगला नीट ठरवतां येईना. पण उमा आपल्याबद्दल चांगलें बोलली हें पाहून तो हर्षभरीत झाला. अन् त्याचे विचार वेगानें भरकटूं लागले.

बसच्या बाजूनें एक उघडी व्हिक्टोरिया चालली होती. त्यांत एक ॲंग्लो–इंडियन जोडपें बसलें होतें. अन् त्यांचे प्रणयाचे अनेक चाळे चालले होते. प्रेमसिंगानें उमाचें लक्ष तिकडे वेधलें व म्हटलें,

'...तें पाहा, दोघें कशीं मजा लुटीत आहेत. आयुष्यांत चैन करायचं ह्यांना छान ठाऊक असतं–नाहीं ?–आपण लोक खोट्या मर्यादा बाळगतों नि ह्या गहिऱ्या गंमतीला मुकतों. खरं म्हणजे, आपण सर्व भीति न् सीमा टाळून, येईल ती संधि न् मिळेल तो क्षण उपभोगला पाहिजे—'

बोलणें संपवितांना त्यानें उमाच्या खांद्याला स्पर्श केला. मितभाषणी उमा म्हणाली,

'—खरंच, किती सुखी आहेत तीं दोघेंजणं !'

आपल्या स्पर्शाचा स्वीकार उमानें केला, आपल्या बोलण्याचा आशयही तिला उमगला, असें प्रेमसिंगला वाटलें. एकदम अनेक उडाणटप्पू विचारांचें टोळकें त्याच्या डोक्यांत वावरूं लागलें. व्हिक्टोरिया मागें टाकून बस महमदअली रोडवरून पळूं लागली. अनेक रिकामटेकडे लोक रस्त्यावर थवे करून उगाचच उभे होते. मुसलमानी पेहराव, उर्दू अक्षरांच्या गिचमिड पाट्या, मोठाड व उदास इमारती, चोहोंकडे दिसत होत्या. आजूबाजूला

इतकी बजबजपुरी माजली होती कीं, जणूं प्रेमसिंगच्या मनांतील विकारांचेंच तें प्रतीक होतें.

मन आंवरून प्रेमसिंग मृदुपणें उमाला म्हणाला,

'तुमच्या घरीं मी आलों तर घरच्या लोकांना कांहीं वाटायचं नाहीं ना ?—'

'—छे-छे ?-माझी आई जवळ जवळ आंधळी आहे. मग घरांत मीच मोठी. तीन भाऊ न् तीन बहिणी लहान आहेत—'

प्रेमसिंगनें म्हटलें,

'त्यांची जबाबदारी तुमच्यावरच !-'

'हो-! म्हणून तर नोकरी करावी लागते-'

प्रेमसिंगनें मृदुतर स्वरानें म्हटलें,

'अर्रर्र-तुमचा हा भार कमी केलाच पाहिजे !-मी—'

उमा त्याच्याकडे वळून म्हणाली,

'छे छे !-आम्ही तितके गरिबींत नाहीं जगत. माझे पति मला पैसे पाठवतातच कीं ! युद्धामुळें महागाई वाढली-पण त्यांना बऱ्या पगाराची मिलिटरींत नोकरी लागली-'

प्रेमसिंग विलक्षण थक्क झाला. आपली मनांतली खळबळ कशी लपवावी, कशी आंवरावी, कशी प्रकट करावी-कांहींच कळेना ! बाजूला दिसणाऱ्या जादूच्या दुकानांतील विचित्र वस्तूंकडे व चिनी औषधालयांतील चमत्कारिक चित्रांकडे पाहत तो कसाबसा म्हणाला,

'तुमचं लग्न झालं आहे ?—आणि तुमचे पति मिलिटरींत आहेत ?—'

उमा म्हणाली,

'हो !—सध्यां ते गुजराणवाला येथें असतात—'

प्रेमसिंग भयंकर दचकला ! 'गुजराणवाला' हे शब्द वेडेवांकडे होऊन त्याच्या तोंडून कसे तरी बाहेर पडले. क्षण दोन क्षण तो शून्यवत् बसला. मग त्याच्या मनासमोर एक विलक्षण चित्र अचानक उभें राहिलें ! तें काल्पनिक दृश्य पाहून तो थरथरला !-त्याच्या अंगाला घाम सुटला.

बावरून त्यानें सभोंवार पाहिलें. तें काल्पनिक चित्र अदृश्य झालें होतें. प्रेमसिंग शुद्धीवर आला. आपण असें उमाजवळ बसलों आहोंत हें त्याला समजलें; अन् त्या क्षणीं त्याला वाटलें कीं, आपल्या हृदयाला जबरदस्त अपघात होऊन असंख्य जखमा झाल्या आहेत.........

बस जे. जे. हॉस्पिटलपाशीं उभी राहिली.

दोनचार नर्सेसना आंत घेऊन बस चालू झाली. बसच्या हिसक्यानें प्रेमसिंगला जाग आल्यासारखें झालें. उमा विचारीत होती,

‘ काय झालं ?–एकदम शहारल्यासारखं केलंत ! ’

अपराधी मुद्रा करून प्रेमसिंग म्हणाला,

‘ अं–अं ! जरा थंडी वाजल्यासारखं वाटलं—’

बोलतांना त्यानं उमाकडे पाहण्याचा प्रयत्न केला. पण तो साधला नाहीं. रस्त्यावरच्या ट्रामच्या एका दांड्यांतून असंख्य अग्निकण उडालेले त्याला दिसले. तें पाहून त्यानें डोळे मात्र घट्ट मिटले.

मिटल्या नेत्रांपुढें मघांचेंच दृश्य अस्पष्टपणें दिसलें, अन् प्रेमसिंग पुरा थिजून गेला !

उदास अंतःकरणानें तो बसबाहेर पाहत होता. भायखळा पुलावरून बस गेली. पुलाखालचे मोकळे रूळ पाहून त्याला कसें तरीच वाटलें. बाजूच्या प्रचंड फलकावरील चित्रपटाची जाहिरात फाटली होती. त्यांतल्या सुंदर नटीची छबी फाटली गेलेली पाहून त्याचें हृदय चरारलें. भाजी मार्केट ओसाड पडलें होतें. पॅलेस टॉकीजमधून तिकिटें न मिळालेले लोक निराशेनें परतत होते. संध्याकाळच्या उदास सांवल्या सर्वत्र पसरत होत्या...

राणीच्या बागेंतली झाडी पाहून प्रेमसिंगला जरा बरें वाटलें. उसनें अवसान आणून तो सांवरून बसला. स्वतःचें मन, स्वतःचे विचार सांवरायाचा यत्न सुरू केला. ‘ मन चिंती तें वैरी न चिंती–’ असें आपल्या मनाला बजावलें. उमाच्या खांद्याला स्पर्श करून हृदय पुलकित करायचा प्रयत्न केला. उमाच्या नवऱ्याची सोज्वल आकृति डोळ्यांपुढें उभी करून डोकें शांत करायची खटपट केली. पण सारें फोल ठरूं लागलें. त्याचें मन त्यालाच खाऊं लागलें. उमाच्या खांद्याचा स्पर्श होतांच तो शरमला.

उमाच्या पतीबद्दल कांहीं तरी कल्पना करून डोक्यांतली आग आंवरली जाईना...

...अंतश्चक्षूंसमोर अचानक दिसलेलें तें चमत्कारिक दृश्य आंता कायमचें ठसून गेलें !–

गिरणगांवच्या गर्दीमुळें बस सावकास जात होती. मेंढरासारखे मजूर गटागटांनीं गिरण्याबाहेर पडत होते. धुरकटलेले गिरण्यांचे बंब अन् त्याभोंवतालीं दिसणारीं कामगारांचीं खुरटलेलीं खुराडीं-दैन्याचा तो उकिरडा पाहून प्रेमसिंगला सर्वत्र अंधार दिसूं लागला.

अन् मग त्या अंधारांत अनेक आठवणी आठवल्या. सिम्लर्समधला अन्वरखान ! दारूच्या नशेंत, टाकलेल्या पहिल्या बायकोच्या आठवणीनें ढसढसां रडत असे. तसाच मृत्युशय्येवरील कमांडर जेन्किन्स. पुन्हां पुन्हां म्हणे, इराकमध्यें एका खेडवळ मुलीला मीं फसवलें होतें—ती मला क्षमा करील का ?—पश्चात्तापाची, दुसऱ्यावर अन्याय केल्याची, सन्मार्ग सोडल्याची जाणीव, केव्हां तरी, कुठें तरी, प्रकट होते. मृत्युशय्येवर, दुसऱ्या अवस्थेंत असतांना त्या खोल लपवलेल्या भावना उफाळून येतात. प्रेमसिंगचा अनुभव तर ह्याहूनही निराळा होता. उन्मादाच्या ऐन भरांत त्याला पापाच्या जाणीवेचा चटका बसला होता !

किती विस्मयजनक दृश्य होतें तें अन् विकृत सुद्धां ! मानवी मन किती अद्भुत् आहे. विकृतीसुद्धां अशी उपकारक ठरते ! विकृति तरी कशी म्हणायची ? मनोव्यापारांच्या साऱ्या सीमा जिथें एकमेकांत—

प्रेमसिंगला एक उपमा आठवली. रंगीत काचांचे तुकडे नळकांड्यांतून पाहायचें एक खेळणें आहे. दर खेपेला त्यांत नवीन आकृति दिसतात. जरा नळकांडें हालवलें कीं नव्या आकृति तयार होतात. माणसाच्या मनाला थोडासा जरी धक्का बसला, तरी साऱ्या भावनांची अशी उलथापालथ होते नि......

त्याला आपली उपमा आवडली. त्या भरांत त्यानें उमाकडे पाहिलें. हृदयांतले वेडे विकार अदृश्य झाले होते. मघांची भीतिही लोपली होती आतां.

उमा विचारीत होती,

'तो पाहा—तुकाराम सिनेमा लागला आहे वाटतं—तुम्हीं पाहिला आहे ?—'

'नाहीं–आपण जाऊं एकदां !–तुमचे भाऊ, बहिणी, सारेच मिळून जाऊं—'

हा विशाल विचार त्याला कसा सुचला कोण जाणे !–त्याचें हृदय आनंदानें भरून आले होतें. ग्रीन्समधील मद्याचें हें सुख नव्हतें. युरेशियन युवतीच्या मिठींतला हा आनंद नव्हता. हा आनंद–हा आनंद...

दादरच्या चौकांत बस उभी राहिली. चोहोंकडे दिवे उजळत होते. चारी बाजूनें टुमदार दुकाने भरलेलीं होतीं. मधल्या बेटात हिरव्या गवताचा गालिचा रेखला होता.

प्रेमसिंगचे मन बाहेरचें वातावरण पाहून प्रसन्न झालें. अंतःकरणांतली काजळीही आटली असल्याचे त्याला उमजले. तें असंभवनीय दृश्य, तो विकृत विचार, चमत्कारिक कल्पना–त्याला भेडसावूं शकेना.

तें दृश्य प्रेमसिंगला पुन्हां आठवलें. उमा रणदिवेचा पति मिलिटरींत नि तोही गुजराणवाला येथें आहे हे त्याला समजलें. अन् त्या क्षणीं तिच्या पतीचें अस्तित्व, त्याचें सैन्यांतलें आयुष्य, गुजराणवालांतलें स्वतःचें घर, प्रेमसिंगला आठवले. तो दचकला. धक्का बसलेल्या मनाला भलतेंच दृश्य दिसलें ! त्याला एकाएकी वाटलें कीं, बाजाराच्या टोकाशीं असलेल्या आपल्या घरापाशीं तो रणदिवे खाकी पोषाखांत उभा आहे, अन् आपल्या पत्नीशीं चेष्टितें करायचा प्रयत्न करीत आहे ! !

टिळक पुलावरून बस गेली. पुलाखालचें अनेक रुळांचें जाळें पाहतांना प्रेमसिंग पुटपुटला–माणसाचें मन किती गुंतागुंतीचे आहे !

उमा रणदिवे उठत म्हणाली,

'चलणार ना–मला इथंच उतरायचं—'

प्रेमसिंग शांतपणें व दृढनिश्चयानें म्हणाला,

'आज नको, मला बरं नाही वाटत.'

उमा उठून गेली, अन् बळणें घेत बस शिवाजी पार्कपाशीं आली.

शिवाजी पार्क.

## दुसरी दासी

५

समईच्या सौम्य प्रकाशांत आक्का शून्यपणें बसली होती. मांडीवरील मिटलेल्या पुस्तकांत खुणेचें बोट, मोठाल्या मिटलेल्या डोळ्यांत आसुसलेले अश्रु अन् हृदयाच्या गाभ्यांत सलणारें दुःख ! किती तरी वेळ ती तशीच तटस्थपणें बसली होती. जणूं देवघरांतली एक देवीच ! जणूं समोरच्या रविवर्म्याच्या चित्रांतली कुणी स्त्री. दिसायला चारचौघां कोंकणस्थांच्या बायकांसारखी ती होती. देवघरांतल्या वातावरणानें ती अधिकच प्रसन्न वाटत होती. तिचा स्वभाव आपट्यांच्या एकाद्या नायिकेसारखा होता. सालस नि आनंदी ! आनंदी खरा—पण आतां मात्र ती विषण्ण अंतःकरणानें बसली होती.

समईकांठची ज्योत लहान झाली. सभोंवतालच्या सांवल्या विस्तारल्या. आक्काची समाधि चाळवली. बावरून तिनें इकडे तिकडे पाहिलें. सर्वत्र भयाण शांतता होती. त्या दोन खोल्यांच्या बिऱ्हाडांत दुसरें कुणीही नव्हतें. चुलीपासची भाटी देखील निघून गेली होती. चुलींतला विस्तव विझून गेला होता. त्या राखेकडे पाहतांना आक्कानें कपाळावरून हात फिरवला. त्या कपाळींचें कुंकू असेंच फिक्कट पडत अखेर लुप्त झालें होतें !

कपाळावरचा हात डोळयांवरून फिरवीत आक्कानें ओघळूं पाहणारे अश्रू निपटून टाकले. कित्येक दिवसांत तिचे डोळे ठिबकले नव्हते. आज अचानक आलेलें हें पाणी पाहून आक्काचें हृदय थरारलें. आपल्या नेत्रांचे आणखी काय काय धिंडवडे होणार, हें तिला कळेना!—जगाकडे निर्व्याजपणें पाहणारे ते बाळपणाचे भोळे डोळे, लग्नानंतर पतीकडे पाहणारे ते यौवनांतले सलज्ज नेत्र, अनेक वर्षें एकत्र राहिल्यावरही पतीनें त्याग करतांच पोळलेली ती जखमी नजर, परित्यक्तावस्थेंतील तीं भकास बुबुळें अन् पतिनिधना-नंतरची विझलेल्या वातीगत झालेली ही शून्य दृष्टि! सारीं बदलतीं दृश्यें पाहतांना तिच्या नेत्रांतून असंख्य आंसवें ओघळलीं होतीं. त्या साऱ्या अवस्थांना अन् अश्रूंना अर्थ होता. पण भावनांचा आजचा खळखळाट पाहून तिचें तिलाच धडधडूं लागलें.

आज अगदीं कठोर, खंबीर मनानें वागायचें तिनें ठरविलें होतें. द्वेष दाखवायचा नाहीं, असा तिनें निश्चय केला होता. आपल्या पतीनें आपणांस अशिक्षित अन् अडाणी ठरविलें होतें; निदान सवतीला तरी तसें वाटूं द्यायचें नाहीं......

तिची सवत आज येणार होती!

हातांतलें दासबोधाचें पुस्तक तसेंच टाकून आक्का देवापुढून दूर झाली. आपण नकळत सवतीची वाट पाहत आहोंत ह्याचें तिला सखेदाश्चर्य वाटलें. तिला चांगलें दिसावें ह्या बेतानें आपण वागत आहोंत, हें केवढें चमत्कारिक!–ज्या स्त्रीनें आपणांस भर संसारांतून उठविलें, आपल्या कुंक-वाला फरपाटे ओढले—

अन् मग आठवणी नि अनेक विचार डोक्यांत पिंगा घालूं लागले. उपेक्षित, परित्यक्त व विधवा–साऱ्या करुण अवस्थांचें आक्रंदन मनांत सुरू झालें. आणि जणूं काय कधींच संपणार नाहींत, असे आक्रांताचे अश्रू कोसळूं लागले.

संधिप्रकाश संपण्याच्या सुमारास माई येऊन पोंचली. टांगेवाल्याचे पैसे चुकते करून ती आंत आली. बरोबर असलेली बॅग तिनें खालीं ठेवली. हातांत पैशाची पिशवी, डोळ्यांत प्रवासाचा शीण, हृदयांत किंचित्

अस्वस्थता ! मासिकावरच्या एकाद्या चित्रासारखी ती दिसत होती. प्रवासी पोशाखानें ती अधिकच आकर्षक वाटत होती. तिचा स्वभाव फडक्यांच्या एकाद्या नायिकेसारखा होता. साधा नि स्वच्छंदी ! स्वच्छंदी खरा—पण आतां मात्र ती मलूल मनानें उभी होती.

उंबरठ्यापाशीं उभ्या असलेल्या माईला आंत बोलावण्याचेंही भान आक्काला उरलें नव्हतें. आपल्या सवतीची सांवली पाहून तिला धडधडल्यासारखें झालें. प्रथम तिच्याकडे पाहायची भीति वाटली. पण मग ती एकाएकीं तिच्याकडे वेड्यासारखी पाहूं लागली. माईच्या कपाळीं कुंकू होतें ! आक्काचा डोळयांवर विश्वासच बसेना ! परित्यक्तावस्थेंतही आक्कानें आपलें कुंकू अमोल ठेव्यासारखें सांभाळलें अन् पति वारल्यावर विरक्तपणें तें वाढवून टाकलें, अन् ही तिची सवत ! तिचाही नवराच मेला होता. पण संधिप्रकाशांतही तिचें कपाळ कुंकवानें खुलून दिसत होते ! त्या शोभेकडे आक्का भ्रमिष्टासारखी पाहूं लागली—

आपलें स्वागत व्हायचें नाहीं ह्याची माईला जाणीव होती. ती आंत आली. चटईवर बसत म्हणाली,

" दुसरं कुणीच येण्यासारखं नव्हतं म्हणून मला यावं लागलं. इथं गाड्याही अशा अडनिड—काम आटोपून परत जायला लगेच गाडीही नाही. सारी रात्र इथं काढून सकाळींच परतायला हवं ! "

स्तब्धतेचा भंग झाला. त्यानें आक्काला जरा धीर आला. माईच्या बोलण्यांतला परकेपणा तिला स्वागतार्ह वाटला. शुष्कपणें तिनें विचारलें,

" जेवण व्हायचं आहे ना ?—"

" छे छे. गाडींत खूप खाणं झालंय्. कॉलेजमधली एक जुनी मैत्रीण भेटली अचानक. सारख्या खातच होतो दोघीजणी ! तोंड मात्र धुतें—"

माई तोंड धुवायला गेली. तेवढ्यांत आक्कानें आधण चढवलें व चहा बनवला. आपल्याला भर संसारांतून उठविणाऱ्या अवदसेला आपण इतकें आदरातिथ्य दाखवीत आहोंत, ह्याचा तिला एकीकडे चमत्कार वाटत होता. पाहुण्याबद्दल अगत्य दाखवायचें वळण तिला होतें खरें, पण आयुष्यांतल्या ह्या आगंतुकाचा द्वेष करायचेंही तिच्या मनाला

शिकविलें होतें. अक्काला वाटलें, इतके दिवस आपण अपमान सोसला, दारुण मनोयातना भोगल्या, आपल्या आयुष्याचें तळपट करून आनंदानें जगणाऱ्या आपल्या सवतीच्या भाग्याबद्दल खेद मानला. आज साऱ्याचें उट्टें काढायची संधि घरीं चालून आली आहे. ज्या चांडाळणीनें आपल्या संसाराचें मातेरें केलें तिला दोन तरी कटु शब्द बोलायची वेळ अखेर आपल्या हातांत आली आहे.

माई आंत आली. तें टुमदार चूलघर पाहून तिला कसेंसेंच वाटलें. तिचें सारें आयुष्य मुलींच्या वसतिगृहांत गेलें होतें. लग्न उशीरां झालेलें अन् तें देखील बौद्धिक सहवासासाठीं एका सपत्नीकाशीं केलेलें. तिचा संवगडी असा उशीरां भेटला. स्वतःचा बाळसेदार संसार सजविण्याची कल्पनाही कळकट वाटण्याची वृत्ति तेव्हां निर्माण झालेली. पतीच्या बुद्धिवैभवाचे मनोरे पाहतां पाहतां ती चूलबोळकीं विसरली. आज तिच्या पतीचें नांव असलेलीं हीं भांडीकुंडीं बघून तिचें अंतःकरण विषादानें भरून गेलें. आपल्या सुग्रण सवतीच्या संसाराकडे पाहतांच त्या अंतःकरणात असूयेचे असंख्य बुडबुडे उकळूं लागले.

चहा संपल्यावर हे विचारही संपले. दोघीही बाहेर आल्या. माईनें बॅग उघडून एक छोटी पेटी बाहेर काढली व ती म्हणाली,

"ज्यासाठीं मला मुद्दाम यावं लागलं, तें काम आधीं उरकून टाकूं !"

आक्काच्या पांढऱ्या कपाळाला आंठ्या पडलेल्या पाहून माईच्या भुंवया वांकड्या झाल्या. पेटी उघडीत ती म्हणाली,

"ते अचानक गेले, त्यामुळं सारा पसारा तसाच मागं पडला. मृत्युपत्र केलं नव्हतं न् कांहीं सांगितलंही नव्हतं. वर्ष झालं—आतां व्याप आवरायला हवा..." आवंढा गिळून माई पुढें म्हणाली, "हे दागिने तुमचे ! तुम्ही गेलांत तेव्हां तसेच टाकून गेलांत ! आतां तरी ते तुम्ही घ्यावेत—"

उघड्या पेटींतून दिसणारी ती नथ, मोहनमाळ इत्यादि अलंकार पाहतांच आक्काला चक्कर आल्यागत झालें. तिचें हृदय जड झालें अन् मोठाले हुंदके येणार कीं काय, अशी भीति वाटूं लागली.

आक्काची ती शून्य दृष्टि पाहून माई म्हणाली,

" हें जोखीम दुसरं कोण सांभाळणार ? अन् दुसऱ्या कुणाच्या स्वाधीन करायचं हें ? तुमच्या माहेरचे आहेत बहुतेक सारे दागिने !–तुमचं स्त्रीधन ! "

आक्काचे उमाळे एकदम आटले अन् ती भकासपणें उद्गारली, " स्त्रीधन ! ! "

तो शब्द त्या अंधेऱ्या खोलींत घुमून गेला. आक्काला स्वतःलाच तो आवाज घुबडाच्या ओरड्यासारखा अभद्र भासला. नवऱ्यानें दुसरें लग्न केल्यावर सारें सोनें, सारे दागिने टाकून ती दूर झाली होती. तिचें जीवन-सर्वस्वच हरवलें होतें. तिच्या मंगलसूत्राची विटंबना झाली होती. अन् सौभाग्यचिन्ह तोडून टाकल्यावर आतां हें स्त्रीधन तिच्यापुढें वांकुल्या दाखवीत होतें !

माईला देखील जरा अस्वस्थ वाटलें. क्षणभरानें ती म्हणाली,

" दागिने मी ठेवून घेऊं शकत नाहीं. ह्या जोखमींतून मला सुटायला हवं ! माझा वांटा निराळा आहे. त्यांच्या चित्रांची सर्व जबाबदारी सांभाळायची आहे—"

आक्का आपलें बोलणें ऐकते आहे, हें पाहिल्यावर माई अधिक वेगानें बोलूं लागली,

" त्यांचीं सारीं पेंटिंग्स, निरनिराळे करार, चित्रांचं प्रदर्शन वगैरेंची सर्व व्यवस्था मी करतेंच आहें. ते फार मोठे चित्रकार होते, हें आतां जगाला उमगायला लागलं !–पण त्यामुळं माझ्या कामाचा व्यापही वाढला. चित्रांची विक्री करण्यापासून त्यांच्या स्वतःच्या फोटोचा अनावरण–समारंभ करण्या-पर्यंत नाहीं नाहीं त्या गोष्टी चालू आहेत. जाऊं दे तें ! तुम्हाला कशाला ऐकवूं ती सारी कटकट ! मला तुमच्या ताब्यांत स्टुडिओ आहे, तो हवा आहे. त्याची किल्ली माझ्या स्वाधीन कां नाहीं करीत तुम्ही ? मीं तुम्हांला दोनदां निरोप धाडले..."

बोलण्याचा वेग कमी करीत माई मध्येंच थांबली, अन् पदरानें तोंड पुशीत ती प्रश्नांकित मुद्रेनें आक्काकडे पाहूं लागली.

आक्काला क्षणमात्र उत्तर सुचेना. तिनें थोड्या वेळानें भ्रमिष्टासारखें विचारलें,

"कशासाठीं हवाय् तो स्टुडिओ तुम्हाला ? जुनाट जागा आहे ती. पांच सहा अपुरीं चित्रं अन् थोडं रंगाचं सामान ह्याखेरीज कांहीं नाहीं तिथं !— मुंबईचा मोठा नवा स्टुडिओ तुमच्याकडे आहे ! त्यांचीं सारीं चित्रं तर तुमच्यापाशींच आहेत. इतकी संपत्ति—"

"संपत्तीचा प्रश्न नाहीं हा ! तुमचे सारे दागिने इतकाही लोभ न धरतां नाहीं का दिले मीं ? दागिन्यांची मला आवड असूनही मीं ते तुम्हाला दिले ! आतां—"

ते बोलणें आक्काला चमत्कारिक वाटलें. जराशी चिडूनच ती म्हणाली,

"म्हणजे–त्याच्या बदली स्टुडिओ मागतां तुम्ही ? तसं-तसं असेल तर मग हे दागिने घ्या–हा चंद्रहार स्टुडिओसाठीं किंमत म्हणून—"

बोलतां बोलतां आक्कानें डब्यांतला चंद्रहार चिमटींत उचलला अन् पुढें धरला. तिचे ओंठ थरथरले आणि कुठल्या तरी पाशवी शक्तीला आपण अखेरचा प्रतिकार करायला हवा आहे, अशी भावना तिच्या डोळ्यांत गोळा झाली.

समईच्या मंद प्रकाशांत चमकणारा चंद्रहार पाहून माईला कसेंसेंच झालें. कसल्या चमत्कारिक प्रसंगांत ती सांपडली होती ! ह्या अडाणी बाईच्या नादीं न लागतां असेंच इथून निघून जावें, असा विचार तिच्या मनांत आला.

पण तिनें म्हटलें,

"कां मुद्दाम विपर्यास करितां तुम्ही माझ्या बोलण्याचा ? दागिने तुमच्याकडे अन् त्यांच्या कलाविषयक सर्व गोष्टी माझ्याकडे अशी विभागणी आहे म्हणून मी स्टुडिओ मागतें आहें."

"कसली विभागणी ? कुणी केली विभागणी ?–"

"त्यांचे कामाचे सारे व्यवहार माझ्याकडे न् भांडीकुंडीं, दागदागिने तुमच्याकडे ही वांटणी अगदीं स्पष्ट आहे. त्यांनीं अशीच व्यवस्था केली

असती. सारं जग असंच समजून आहे. तुम्हालाही हें ठाऊक आहे. कशाला उगाच वाद वाढवतां ?—मला किल्ली द्या, मी जातें. तुम्हाला त्रास पोंचावा अशी माझी इच्छा नाहीं–कधींच नव्हती ! ”

तें ऐकतांच आक्का एकदम थरथरली व म्हणाली,

“—म्हणूनच आज छळायला आलांत मला ? त्यांची एक मोडकी स्टुडिओची खोली–तीही माझा आसरा हिसकावून घ्यायला आलांत तुम्ही ? भर संसारांतून मला उठवलंत, माझ्या सुखावर निखारे ठेवलेत...”

आक्काचा कंठ भरून आला. तिच्या शब्दाचें पाणी पाणी झालें अन् ओठाकंठांत तें झिरपून गेलें.

माईचे डोळे लाल झाले. घसा साफ करून ती म्हणाली,

“ काय हो निखारे ठेवले मीं तुमच्या सुखावर ? लग्न झाल्यापासून हे कुजके शब्द ऐकतें आहें मी तुम्हां लोकांकडून ? मला कां दोष देतां सारीं जणं ? ज्या माणसावर मीं प्रेम केलं, त्याला पहिली बायको असणं हा कांहीं माझा उणेपणा नाहीं. मीं त्यांना फसवलं नाहीं, भुलवलं नाहीं ! उघडेपणं प्रेम केलं नि सरळपणं लग्न केलं ! काय पाप केलं मीं असं, की साऱ्या जगानं माझ्याविरुद्ध काहूर करावं इतकं ? ”

—आक्काच्या हृदयांत भावनांचें इतकें तुफान माजलें होतें कां, माईच्या वाग्बाणांचा वाराही तिला लागला नाहीं. आपला आजवरचा समतोल स्वभाव कुठें गेला, हें तिचें तिलाच उमगत नव्हतें. इतके दिवस मनांत सांचलेलीं अपमानाचीं शल्यें झाडून टाकण्यासाठीं आपला तोल जायला हवा असें तिला वाटत होतें. शिकलेल्या सवतीशीं वाद करायची शक्ति तिच्यांत नव्हती. पण आपला मुखदुर्बळपणा दूर करून निदान चार शिव्या तरी देतां याव्यात ह्या विचारानें ती म्हणाली,

“ खरं आहे ! कांगावा आम्हीं केला. चुकलं खरंच आमचं ! तेव्हांच झिंज्या ओढून घराबाहेर घालवायला हवं होतं. मैत्रीच्या नांवाखालीं घरांत घुसलीस अन् सवत म्हणून मला संसारांतून उठवलंस ! कसलं उघड प्रेम नू लग्न ?–चांडाळणी ! ”

" गप्प बसा–तोंडाला येईल तें काय बरळतां ? काय संबंध तुमचा मला बोलण्याचा ? स्वतःचा नवरा सांभाळतां येईना तुम्हाला ! इतका प्रतिभावान् पुरुष पत्करायची पात्रताच नव्हती तुमची ! अशिक्षित, अडाणी—"

माईच्या क्रुद्ध नजरेकडे आक्कानें तिरस्कारानें पाहिलें अन् तिच्यापुढें हात ओवाळीत म्हटलें,

"—अन् तुमचं कृत्य अगदीं शिकलेल्यांना लाजवणारं झालं ना ? शिकूनसवरून हेच दिवे पाजळलेत ना ? जगांतले सारे पुरुष मेले होते ? काय साधलंत माझा संसार उष्टावून ? कां माझ्या मंगळसूत्राला हात घातलात ? "

पुढें पसरलेले हात आक्कानें जवळ घेतले अन् आपल्या ओक्या गळ्याशीं धरले. सवतीला दुखवल्याचा आसुरी आनंद त्या बेभान अवस्थेंत तिला होत होता. आंतल्या खोलींतून दिसणाऱ्या चुलींतल्या राखेंत एकदोन ठिणग्या चमकल्या; बाहेर गेलेली मांजरीही चुलीपाशीं येऊन बसली होती; तें पाहून आक्काच्या भिरभिरल्या जीवाला धीर आला.

बाहेरच्या दारांतून आलेले वाऱ्याचे बारके झोत आक्काच्या अंगाला झोंबत होते. तिच्या वृत्तींतली चीड अधिकच वाढत होती. ती म्हणाली,

" हें सारं मंगळसूत्र बांधणाऱ्याला विचारलं असतं, तर डोळे उघडले असते तेव्हांच !—म्हणजे मला बोल न लावतां स्वतःलाच दोष देत बसलां असतां. वीस वर्षं रखडत संसार केला त्यांनीं तुमच्याशीं ! आईबापांनीं अडाणी जोखड गळ्यांत बांधलं–त्याचा त्रास सहन करतां करतां त्यांना नको झालं ! मीं नाहीं तुम्हाला संसारांतून उठवलं, तुम्हींच नवऱ्याला नरकांत लोटत होतांत; त्यांचा कोंडमारा करीत होतांत. काय सुख दिलंत हो तुम्हीं त्यांना ? "

तिचीं विषारी वाक्यें ऐकून आक्काचें बेभान मन भडकलें. नकळत ती बावरून उद्गारली,

" काय सुख दिलं मीं ?—"

" हो–काय सुख दिलंत त्यांना ?–त्यांच्या कलेचं कधीं तरी कौतुक केलंत ? त्यांच्या विचारांना कधीं तरी साथ दिलीत ? बौद्धिक मीलनावांचून त्यांचा

जीव वीस वर्षं तडफडत राहिला! तुमच्या संगतींत सत्यानाश झाला त्यांचा!—तुम्ही जीव घेत होतांत त्यांचा......"

माईचे पुढचे शब्द आक्काला ऐकूं आले नाहींत. पतीची तीव्र आठवण तिला आली–अन् कधीं न वाटलेल्या भीतिनें ती गुदमरून गेली. सवतीचे शब्द ऐकायचा ती यत्न करूं लागली. पण ती नुसती हंसत सुटली आहेसें आक्काला वाटलें. तिनें भेदरून सवतीच्या नजरेला नजर देण्याचा प्रयत्न केला. पण तेवढ्यांत समई विझली अन् सर्वत्र अंधार पसरला. आक्काला घेरी आल्यासारखें झालें. दोन्ही हातांनीं डोकें दाबीत ती म्हणाली,

"बोला–वाटेल तें बोला! जीव घ्या माझा!"

तिचा स्वर अगदीं रडका झाला. स्वतःवरच चिडून तिनें कनवटीची किल्ली काढली न् माईच्या दिशेकडे भिरकावली. तेवढ्यानें तिचें समाधान झालें नाहीं. जवळचा दागिन्यांचा डबा तिनें पुढें ढकलला. तिला वाटलें, आतां तरी दुःखाचे न् संतापाचे उमाळे आंवरले जातील. पण मनाचे बांध पार कोसळले होते नि डोळ्यांतलीं आंसवें अटकेपार उतरलीं होतीं.

माईला सुन्न सुन्न झालें. काय करावें, काय बोलावें, कांहींच सुचेना! हृदय गोठलें होतें न् हातपाय मुंग्यांनीं भरले होते. तिनें बॅगेंतलें पांघरूण काढलें अन् शेजारच्या चटईवर ती आडवी झाली.

× × ×

चंद्राच्या तुकड्याचा प्रकाश खिडकीच्या फटींतून खोलींत आला. माईची झोंप चाळवली. उजेड चुकविण्यासाठीं तिनें कुशी बदलली. पण निद्रेचा अंमल सुरू होईना. जाग्या झालेल्या मनांत एक एक विचार उगवूं लागला. अन् थोड्याच वेळांत सताड डोळे उघडून माई उठून बसली.

आपण सवतीच्या घरीं आहोंत ह्याची आठवण होतांच ती बेचैन झाली. तिला झोंपेपूर्वीच्या भांडणाची आठवण झाली. दागिन्यांचा डबा द्यायचा अन् किल्ली घेऊन परतायचें ह्या हिशोबानें ती आली होती. पण झालें भलतेंच! सवतीशीं वेडेंवांकडें भांडण करावें लागलें तिला! त्या भांडणाला कांहीं अर्थही नव्हता. मागल्या जन्मींच्या जशा कांहीं उखाळ्यापाखाळ्या काढाव्यात, तशा नवरा मेल्यावर गतवैभवाबद्दल भांडल्या त्या! माईला

वाटलें, केवढा मूर्खपणा हा ! अंधारांत तिनें मोठे डोळे करून खोलीभर नजर फिरवली. अन् काय आश्चर्य ! तिची सवत खोलींत नव्हती. माईनें बुबुळें मोठीं केलीं, श्वास रोधला, पण आक्काच्या अस्तित्वाचा अंदाज येईना. माईच्या मनीं नाना विकल्प आले अन् तिनें हांक मारली,

"आक्का—आक्का !—"

हांकेला उत्तर आलें नाहीं. भीतीनें माई उभी राहिली. तिनें पुन्हां हांक मारली. पण उत्तर आलें नाहीं. शेजारची लोटलेली खिडकी पुरी खोलून तिनें अपुऱ्या उजेडांत पुन्हां खोलीभर पाहिलें. आक्का कुठेंच नव्हती. आक्का नाहींशी झाली होती.

देवघरांतली समई पेटविण्यासाठीं माई पुढें झाली. तेवढ्यांत तिला आंतल्या अंगणाच्या दिशेनें अंधुक उजेड दिसला. माई थबकली. अंगणाच्या दुसऱ्या टोंकाला स्टुडिओ होता. तेथून दिवा दिसत होता. आक्का तेथेंच गेली असणार. माईच्या मनांत नाना विचार उजळूं लागले. नकळत ती स्टूडिओच्या दिशेनें चालूं लागली.

—स्टूडिओंत जळती मेणबत्ती जवळ ठेवून एका चित्रफलकापाशीं आक्का डोळे मिटून उभी होती. स्टुडिओंत अपुरा उजेड होता. पण तेवढ्यांतही खोलींतलें दैन्य दृष्टीस पडत होतें. एक दोन फलक, भिंतीस लटकलेलीं कांहीं चित्रें, रंगाच्या सामानानें भरलेलें कपाट, अन् थोड्या खुर्च्या न् स्टुलें...एकाद्या मृत चित्रकाराची मोडकळलेली खोली म्हणून तो चांगला चित्रविषय होता. तेथें त्याची विधवा शून्यपणें उभी होती. इतकें सुंदर मॉडेल व चटका लावणारी पोझ पाहायला मिळणें महा मुष्कील होतें !

तें दृश्य पाहून माईला मात्र विलक्षण धक्का बसला. मागें परतावें कीं काय हें ठरवायच्या आधींच ती आंत आली अन् उद्गारली. "आक्का !"

आक्का हालली. भांबावली. माईला पाहून भेदरून म्हणाली,

"तुम्हीं–तुम्हीं कशा इथं ?—"

घाबरलेल्या मनोवृत्ति विझवण्यासाठीं पदरानें वारा घेत माई म्हणाली,

" जागी झालें मघां-तों खोलींत दिसेनात तुम्हीं ! मला फार भय वाटलं. तुम्हाला शोधीत इथं आलें. अपरात्रीं कशाला आलांत इथं ? किती वेळ आहांत ?-तुम्हाला भय नाहीं वाटत ? "

" भय !—" आक्कानें कुठें तरी पाहून शब्द उच्चारले; पण मग माईकडे पाहून ती घाईनें म्हणाली,

" चला-जाऊं या ! तुमची झोंपमोड झाली उगाच. "

दोन चार क्षण तसेच गेले. दोघींचें पाऊल हाललें नाहीं. मेणबत्तीच्या उजेडाच्या आटोक्यापलीकडल्या वस्तू पाहण्याचा प्रयत्न करीत माईची दृष्टि फिरत होती; अन् माई कोठल्या हेतूनें कुठेकुठें न्याहाळीत आहेत हें आक्का रोखून पाहत होती.

अखेर आक्का म्हणाली, •

" तुम्ही थांबणार इथं ?-थांबत असाल तर मी जातें पुढें. कुलुप लावून या तुम्हीं मागाहून. ही किल्ली घ्या-तुमच्या कायमचीच स्वाधीन करतें ! "

आक्कानें हातांतली किल्ली माईपुढें केली. माईनें तिकडे पाहिलेंही नाहीं. ती सावकाश उद्गारली,

" —पण-पण—"

" पण काय ? "

चौफेर पाहून माई म्हणाली,

" पण ह्या कोंपऱ्यांतली चूल काय झाली ? ह्या कोंपऱ्यांत चूल होती, भांड्यांचं फडताळ होतं-तें कुठंय् ! तिकडच्या कोंपऱ्यांत छोटी मोरी होती; तीही मोडकळली आहे-ह्या स्टूडिओचं स्वरूप अगदीं बदललेलं दिसतंय् !—"

माईचा स्वर, माईची नजर, आक्काला चमत्कारिक वाटली. ती म्हणाली,

" ती अडगळ कशाला हवी आहे तुम्हाला ? आतां ही जागा मीं शक्य तितकी नीटनेटकी केली आहे. चित्रं, पडदे—"

" पण मला पूर्वीची अडगळच हवी होती ! "

माई मध्येंच उद्गारली अन् मटकन् शेजारच्या स्टुलावर बसली. आक्काला तें सारें चमत्कारिक वाटलें. माईच्या वर्तनाचा, शब्दांचा उमजच पडेना. तिनें खोलीभर दृष्टि फेकली. गेले कित्येक दिवस ही खोली नटवायचा ती यत्न करीत होती. एका कोंपऱ्यांत पुस्तकें मांडून ठेवलीं होती; तेथें ती रोज अभ्यास करी. दुसऱ्या जागीं लांकडी घोड्यावर फलक लावले होते; तेथें उभें राहून ती चित्रकला शिकायचा यत्न करी. सर्व वस्तूंत सुधारणा करून स्वतःला सुसंस्कृत, सुशिक्षित करण्याची ती पराकाष्ठा करीत होती. अन् म्हणूनच पूर्वीचीं चूलबोळकीं—ती माईला म्हणाली,

"अडगळ ?—त्या अडगळीमुळंच माझ्यावर आपत्ति आली! हीं चूलबोळकीं घेऊन मी संसारांत दंग झालें होतें. माझं बारकं जग, माझीं बारकीं दुःखं, ह्यांतच रमलें होतें. त्या दुसऱ्या कोंपऱ्यांत ते चित्र काढीत जगाबाहेर पाहत होते. एका खोलींत राहून आम्ही दोघींचीं दोन जगं निर्माण केलीं अन् त्यांतच माझं भाग्य हरवलं! मला अशिक्षित, अडाणी, ठरवणारीं तीं चूलबोळकीं कशाला हवीं आहेत तुम्हांला ?—"

"आक्का—आक्का—" माई आवेगानें उद्गारली. आक्का असें हृदयांतलें बोलेल ह्याची तिला कल्पना नव्हती. ती कांहीं तरी बोलणार तेवढ्यांत आक्का पुन्हां म्हणाली,

"किल्ली दतें, स्टुडिओही देतें तुमच्या ताब्यांत—पण माझ्या दुःखावर कशाला डागण्या देतां आणखी! कलावंताची पत्नी व्हायचं भाग्य मला मिळालं,—पण मी दळभद्री! त्यांच्या विचारांशीं कधींच समरस व्हायचा यत्न केला नाहीं. शिक्षणाचा न् बाह्य जगाचा संपर्कही नव्हता मला. माझ्या वैगुण्याच्या गोष्टी आठवून कां मला दुःख देतां ?—"

आक्काला पुढें बोलवेना. ती एकदम थांबली अन् खिडकीबाहेर पाहूं लागली. आपल्याला आज झालंय् काय, हेंच तिला समजेना! आपण काय बोलतों आहोंत, कुणापुढें बोलतो आहोंत, ह्याचीच शुद्ध तिला उरली नव्हती जणूं!—

माईनें घसा साफ केला. खूप निश्चय केला आहे, अशा आविर्भावानें ती बोलूं लागली,

"रागावूं नका, रडूं नका, आक्का! माझ्या वर्तनामुळं तुम्ही आजवर खूप रडलां असाल—पण आतां एकवार तरी रडूं नका! माझं इथं येणंच तुम्हाला तापदायक झालं आहे, माझी स्टुडिओची मागणी तुम्हांला त्रास-दायक वाटते आहे, हें मी ओळखतें!—पण तसं वाटूं देऊं नका. तुमच्या दुःखावर डागण्या द्याव्यात म्हणून मी आलें नाहीं. मला निराळ्या कारणा-करतां स्टुडिओ हवा होता!–तो सुद्धां जुन्या सामानासह—"

तिची नजर आक्काला स्नेहमयी वाटली. तिचीं वाक्यें टोंचणारीं नाहींत, असें तिला वाटलें. म्हणूनच ती ऐकत राहिली.

"मला तीं भांडींकुंडींच हवीं आहेत इथं! ह्या लहानशा खोलींत एके काळीं मांडलेला संसार मला हवा आहे. आक्का, मला ठाऊक आहे, सुरुवातीला अत्यंत कष्टांत संसार केलात तुम्हीं! हे अगदीं नवखे नि अप्रसिद्ध चित्रकार होते, तेव्हां त्यांचा इथं कसाबसा उभारलेला संसार तुम्ही निमूट-पणं आनंदानं चालवलात. तो चालवतांना तुमचं त्यांच्या कलेकडे, विचारांकडे, बुद्धीकडे दुर्लक्ष झालं, ह्यांत तुमचा दोष अगदीं कमीही असेल. त्यांचं कलावंताचं हृदय जोडीदार शोधूं लागलं, ह्यांत त्यांचा दोषही कमी असेल. मी काय सांगूं? त्यांच्याशीं मीं लग्न केलं, ह्यांत माझा दोष आहे कां नाहीं, हेंही मला ठाउक नाहीं. दोष राहूं दे, पण मला यशही आलं नाहीं. मी दुःखी मात्र झालें–"

आक्काला अत्यंत आश्चर्य वाटलें. डोळे फाडून ती माईकडे पाहूं लागली. आपल्याला संसारांतून उठवून ही अवदसा आनंदानें जगत असेल अशी तिची कल्पना होती, तिला धक्का बसला होता.

माई दूरवर पाहत म्हणाली,

"त्यांच्या कलेकरतां मीं जीवाची कुरवंडी केली. जगाच्या टीकेचा विचार केला नाहीं. वयांतील अंतराचा विचार केला नाहीं. त्यांच्या सहवासासाठीं वेडी होऊन त्यांच्याशीं लग्न केलं. बौद्धिक मीलन, विचारांना साथ-हाच एक ध्यास धरला. त्यांची स्फूर्तिदेवता व्हायचं ध्येय ठेवलं. त्या वेडांत तुमचं दुःख जसं मला आठवलं नाहीं, तसा जगाचा रोषही मला बाधला नाहीं. पण भराऱ्या मारणारं माझं मनच पांगळं लागलं. माझं मनच मला भेडसावूं लागलं!"

आक्का म्हणाली,

“ तुम्ही काय म्हणतां तें मला नीट उमगत नाहीं. त्यांनीं त्रास दिला तुम्हाला ? ते तसे नव्हते—”

आपण नवऱ्याच्या सद्वर्तनाची सवतीला ग्वाही देत आहोंत, ह्याची आक्काला क्षणमात्र शरम वाटली. तिनें चोरून माईकडे पाहिलें. माई आपल्याच नादांत होती. क्षणभरानें ती म्हणाली,

“ त्रासबिस नाहीं. त्रास असता, संसाराची दगदग असती, तर एक वेळ चाललं असतं-पण-पण कसं सांगूं तुम्हाला ? ”

बोलतां बोलतां माई अभावितपणें उभी राहिली. आणि आक्काकडे अश्रुपूर्ण नजरेनें पाहूं लागली.

आक्का दचकून मागें सरली. शेजारची मेणबत्ती उचलून वर धरीत ती माईला न्यहळून म्हणाली, “ माई !—”

माईनें झटकन् स्वतःला सांवरलें. चेहरा हंसरा करीत तिनें आक्काच्या हातून मेणबत्ती घेऊन शेजारीं ठेवली व तिकडे पाहत ती म्हणाली,

“ बौद्धिक भुकेनं आम्ही एक झालों. सुंदर चित्रविषय शोधून काढायचे, अभिजात चित्रं रेखायचीं, कलाविषयक वादविवाद करायचे-हा आमच्या आयुष्याचा आराखडा होता. शारीरिक सुखाचा आम्ही खोटा तिरस्कार करीत होतों. संसार, स्वैंपाकपाणी, पोरंबाळं, ह्या गोष्टी आम्हाला रानटी वाटत. कांहीं दिवस नावीन्याचे म्हणून बरे गेले, पण पुढं बौद्धिक सहजीवन जमेना. ते जन्मजात कलावंत अन् मी फक्त रसिक स्त्री. त्यांच्या कलेचं कौतुक करायचं कार्यच फक्त उरलं. बुद्धींत, प्रतिभेंत मी त्यांची बरोबरी करूं शकलें नाहीं. कशी करणार ?—त्यांची प्रतिभा असामान्य म्हणूनच तर भाळलें होतें मी ! ”

बोलतांना माई थांबली न् तिनें वळून आक्काकडे पाहिलें. आक्का आश्चर्याच्या आविर्भावानें त्या अद्भुत गोष्टी ऐकत होती. माई सांगत होती तें तिला पुरतें कळत होतें कीं नाहीं, कोण जाणे !

आक्काकडे पाहत माई म्हणाली,

" कलावंत हा अत्यंत आत्मनिष्ठ असतो. स्वतःच्या कलेचा विचार त्याच्या मनीं चोवीस तास घोळत असतो. मला तर वाटतं, कलेशींच त्याचं लग्न झालेलं असतं अन् त्या मीलनांतून–मंथनांतून–तो निरनिराळ्या कृति निर्माण करतो. ह्यांना तुमच्यापासून दूर केलं तसं ह्या सवतीपासून त्यांना दूर करणं अवश्य आहे, हें मला लग्नानंतर समजलं ! हे आपल्याच नादांत, तंद्रींत असत !—त्या समाधींत त्यांना बायकोही तुच्छ वाटे. माझ्या बुद्धीचा पल्ला पारखून घेतल्यावर हे माझ्याशीं साध्या चर्चेंतही रमेनात. त्यांना टीकाखोर तर राहूं द्या, टीकाकारही नको होतं कुणी. कौतुक करणारी स्त्री एवढ्यापुरतीच त्यांना मी हवी होतें. रंगाचं सामान धुवायचं, अपुऱ्या-पुऱ्या चित्रांतले असले नसलेले गुण गायचे, हॉटेला-समारंभांत चतुर संभाषणं करायचीं–ह्याखेरीज मीं काय केलं ? काय मिळवलं ? "

माईच्या डोळ्यांतलें पाणी पाहून आक्काला चरकल्यासारखें झालें. तिला वाटलें कीं जवळ जावें नि माईला कुरवाळून तिचे अश्रू पुसून टाकावेत. पण त्या साऱ्या प्रसंगानें खिळलेली तिची काया पुढें सरली नाहीं.

माईनें आपले अश्रू ओघळूं दिले. थोडा वेळ अगदीं शांत झालें होतें. मग माई म्हणाली,

" बौद्धिक मीलनाचा फोलपणा मला लवकरच उमगला. निदान कलावंताच्या बाबतींत तरी बौद्धिक सहवास म्हणजे अळवावरचं पाणी आहे. विद्वान पुरुषाला त्याच्या पराक्रमाचं कौतुक करणारी नि त्याचा वैचारिक शीण उतरवणारी स्त्री हवी असते, इतकंच !—ज्या बुद्धीवर भाळून आपण वेडे होतों, त्याच्याशीं सहवास साधून एक प्रकारचं बौद्धिक दास्यच आपण पत्करतों हें मला उमगलं–अन् मी विलक्षण निराश झालें !—आक्का–आक्का, शिकून सवरून, जागृत राहून, बंड करून, अखेर मी दासीच राहिलें ! माझी पायरी मला समजल्यावर माझं हृदय भग्न झालं. मला काय करावं कळेना ! तुम्ही शिकवलं नाहीं म्हणून वडिलांना दोष देतां; टाकलं म्हणून नवऱ्याला दोष देतां ! मी–मी कुणाला दोष देऊं ?—"

हे शब्द उच्चारतांना तिनें आक्काकडे हात पसरून अशा रीतीनें

पाहिलें कीं आक्कानें तिला कुशींत घ्यावें ! आक्कानेंही आपले बाहू पसरले. त्याकडे पाहत माई म्हणाली,

" तुमच्यासारखं स्वैंपाकपाणी, पूजाअर्चा ह्यांत माझं मन रमणारं नव्हतं. दुसरं काय सुख होतं मला ?-ते चित्रकार असल्यानं त्यांना स्त्रीदेहाचंही मोठं वेड उरलं नव्हतं !-आक्का, मी जवळ असूनही टाकल्यासारखी होतें हो ! "

माईचे बोल जणूं हृदय पिचून निघत होते. आक्काला उमाळे अनावर झाले. सारासार विचार विसरून ती माईला मिठी मारणार होती. पण तेवढ्यात मेणबत्ती विझली अन् एकदम किर्रर्र अंधार पसरला.

× × ×

पहांटेच्या कोंवळ्या किरणानें माई जागी झाली. रात्रीं नीट झोंप न आल्यानें डोळे तळावले होते. थोडीशी झोंप घेण्याचा बेत करून तिनें डोळे मिटले. पण मिटल्या डोळ्यांत रात्रीचा प्रसंग स्पष्टपणें सारखा दिसूं लागला. अखेर माई उठून बसली.

आक्का केव्हांच उठून स्वैंपाकघरांत कामाला लागली होती. तिची लगबग माईला ऐकूं येत होती. त्या लगबगीच्या तालावर माईच्या मनाचीं आंदोलनें पुन्हां सुरू झालीं. साऱ्याच घडामोडींचा चमत्कार वाटत होता तिला ! संध्याकाळचे आक्काबरोबरचें तें भांडण अजून भेडसावीत होतें तिला ! उगाच दोनचार कटु शब्द, जातां जातां शिव्या द्याव्यात तसे, उच्चारले गेले होते. अन् मग मध्यरात्रींचा तो भावपूर्ण प्रसंग. स्टूडिओंत एकट्या उभ्या असलेल्या आक्काला पाहून माईचें मन विरघळलें होतें. चूलबोळकीं आंवरून पुस्तकें-चित्रें ह्यांत रमण्याचा विचार करूं पाहणाऱ्या सवतीला पाहून माईचे विचार उफाळून आले अन् आजवर दडवलेले अव्यक्त भाव अखेर आपल्या शत्रूशीं, आपल्या सवतीशीं, तिनें उघड केले. केवढें चमत्कारिक !

माई उठली. आपले विचार तिनें दाबून टाकले. तिला आजच्या गाडीनें परतायचें होतें ! ती लगबगीनें स्वैंपाकघरांत आली. आक्कानें तिच्याकडे न पाहतांच म्हटलें,

" उशीर नाहीं झाला. चहा ठेवलाच आहे. निघतांना थोडं खाऊनही जा—तोंड धुणं होईतोंपर्यंत करतें."

माई मोरींत गेली. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे आक्का अचल लोचनांनीं पाहत राहिली. तिला कालची चमत्कारिक घडामोड आठवली. कारण नसतांना अन् एकाद्या अडाण्यासारखं ती माईला अद्वातद्वा बोलली, ह्याची तिला शरम वाटली. अन् तो मध्यरात्रीचा प्रसंग !—माईजवळ ती मूर्खासारखं बरळली अन् मग माईलाही आपली कहाणी सांगावी लागली. सारेंच विस्मयजनक घडलें !

आक्कानें धांवरें मन आवरलें आणि चहाचें आधण उतरवलें. सवतीला अगत्य दाखवीत आहोंत, ह्याचा जरादेखील विषाद वाटला नाहीं. उलट चहा आटोपून थोडा सांजा तयार करायची तिची गडबड चालू होती.

दोघींनीं चहा घेतला. एकमेकींना आग्रह करून दोघींनींही सांजा खाल्ला. खाणें झाल्यावर माई म्हणाली,

" ट्रंक लावली आहे–बाकी कांहीं राहिलं नाहीं. ती स्टूडिओची किल्ली कशाला ठेवली होतीत ट्रंकेंत ? "

" म्हंजे काय ? ती न्यायला तर आलांत ना इतक्या दूर ? "

" हो—माझा विचार होता, त्या स्टूडिओंत चित्रांची व्यवस्था आहे न् स्वैंपाकाची जागा आहे–तिथंच राहावं. माझी कला चालू ठेवून संसारही थाटतां येईल ! पण तो बेत आतां मीं रद्द केला. तुम्ही त्याचा अधिक चांगला उपयोग करीत आहांत. तुमच्याजवळच—"

आक्का आश्चर्यानें एकदम म्हणाली,

" पण–पण—"

" पण काय ? "

किंचित् गोंधळून आक्का म्हणाली,

" पण आतां मला वाटूं लागलं आहे, कीं थोडंसं शिकणंही मूर्खपणा ठरेल. तुमच्या अनुभवानं—"

माई किंचित् हंसली न् म्हणाली,

" नाहीं–नाहीं ! शिकणं मूर्खपणाचं नाहीं. ज्ञान मिळवणं, कलादृष्टि असणं, हें वाईट कसं ? माझं म्हणणं तर असं आहे कीं, प्रत्येकीनं शिकून-सवरून, जगाशीं समरस होऊन, स्वतःचं जग निर्माण करावं ! माझी फसवणूक झाली माझ्या बौद्धिक भुकेमुळं ! मी एका मोठ्या कलावंताची इच्छा केली अन् गुलाम होऊन बसलें ! "

बशा गोळा करीत आक्का म्हणाली,

" मला नीटसा उमज पडत नाहीं साऱ्या म्हणण्याचा !—मला वाटलं, तुम्ही आनंदांत असाल. पण तुम्हीही दुःखी आहांत ! अन् तशांत मी तुम्हांला काल नाहीं नाहीं तें बोललें ! मला—"

" जाऊं द्या ! तुमची काय चूक ? तुमचा सारा राग उसळून आला होता–"

माईनें पाण्याचा घोट घेतला न् ती म्हणाली,

" आक्का, मी तुमचा कधींच राग केला नाहीं. तुमच्याजवळ राहायची माझी लग्नानंतर तयारी देखील होती. राजाच्या अनेक राण्या नाहीं का राहत ? पाटलाच्या दोन बायका नाहीं का एकत्र राहत ? "

कपबशा विसळतांना आक्कानें चमकून माईकडे पाहिलें. माईचें बोलणें तिला रुचलें नाहीं. ती म्हणाली,

" पण पाटलाच्या बायका कां एकत्र राहतात ठाऊक आहे तुम्हाला ?–राजाच्या राण्यांची तर निराळीच दशा असते ! "

" जाऊं दे ! " म्हणत माई एकदम उठली.

थोड्या वेळानें दोघीही बाहेर आल्या. माईनें ट्रंक बंद केली. स्टूडिओची चावी आक्काच्या हातीं देत ती म्हणाली,

" ही घ्या, माझं ऐका तुम्ही ! त्या स्टूडिओंत अभ्यास करायची तुमची भावना मी जाणतें—"

आक्कानें किल्ली घेतली. काय बोलावें, कांहींच कळेना तिला ! थोडया वेळानें विचार करून वाक्य ठरवून ती म्हणाली,

" पुन्हां कधीं भेटणार ? "

“ पुन्हां ? काय सांगूं ?–भेटायचा यत्न करीन. त्यांच्या मृत्यूनंतर आपल्यांत हा पाश निर्माण झाला, हा केवढा चमत्कार ! चार पांच महिने तर ह्यांच्या चित्रांच्या विक्रीचीं कामं पाहायचीं आहेत मला. मग–मग—”

“ मग ?—”

“ मग–” दुसरीकडे पाहत माई म्हणाली. “ मग मी बहुतेक लग्नाचा विचार करीन–”

आक्का विलक्षण दचकली ! अंगावरून वीज गेल्याप्रमाणें वाटलें तिला. कसेंबसें ती म्हणाली,

“ लग्न–? ”

“ हो–बहुतेक ! बौद्धिक भुकेनें तृप्त झालें आहें–आतां शांतपणं छोटासा संसार सजवायची इच्छा उरली आहे ! ”

पांच सहा मिनिटें स्मशानशांततेंत गेलीं.

मग माई म्हणाली,

“ चमत्कारिक वाटलं ना तुम्हाला ? आम्ही शिकलेल्या मुली म्हणजे कोडंच वाटत असेल तुम्हाला—”

“ असेल कदाचित् ! पण एक विचारूं कां ? लग्न केल्यावर मला नवी सवत म्हणून स्वीकाराल ? ”

माई थक्क होऊन पाहूं लागली. आक्काला देखील स्वतःचें आश्चर्य वाटलें. ती म्हणाली,

“ बघा–दचकलांत ! शिकलेली, न शिकलेली–कांहीं असलं तरी हा प्रश्नच चमत्कारिक, वाईट आहे. मी नाहीं तुमच्या नव्या संसाराआड येणार ! पण एक करा ! पुन्हां कुणा बिचारीच्या कुंकवाला फरपाटे ओढूं नका—”

माईचा विस्मय संपला नव्हता. आतां शरमही प्रकट होऊं लागली. झटकन् घड्याळाकडे पाहत ती म्हणाली,

“ जायला हवं—उशीर होईल ! ”

आक्का म्हणाली,

“ थांबा. तुम्ही मला स्टूडिओ दिलात, आतां हा हार तरी घ्या–”

शेजारच्या पेटींतून चंद्रहार काढीत तिनें पुढें म्हटलें,

"स्टूडिओच्या बद्दल म्हणून नव्हे–पण तुम्ही आतां कधीं भेटणार कुणाला ठाऊक! कदाचित् लग्न करून सासरीं जाल! हा चंद्रहार घ्या. सासरीं अशा मुंडया गळ्यानं जाऊं नये. अन्, अन् तें कोनाडयांतल्या कोयरीतलं कुंकूंही लावा!"

वाक्य संपण्यापूर्वीच तिनें माईच्या गळ्यांत दागिना बांधला.

माईनें न बोलतां बॅग उचलली अन् नुसत्या नजरेनें निरोप घेत ती घराबाहेर पडली.

सवतीचें पाऊल घराबाहेर पडल्यावर आक्काला सुचेनासें झालें. आपल्या मनावरचें दडपण दूर झालें, कीं कसली नवी धोंड बसली, हें तिला कळेना. शिकलेल्या सवतीशीं तिनें नीट सामना दिला. आल्यावर तिला शिव्या दिल्या. अन् आतां जातांना तिला शरमिंदें केलें. पण इतका विजय मिळ-वूनही आक्काला आनंद वाटेना. अगदीं चमत्कारिक वाटत होतें तिला. संध्याकाळचें भांडण, मध्यरात्रीचें हृदयनिवेदन अन् आत्तांचा हा वियोग-प्रसंग! सारी घडामोड अनपेक्षित अन् अद्‌भुत झाली. आपली सवत देखील दुःखी आहे, हें समजल्यानें आक्काला आनंद वाटायचा, तोही वाटेना! स्त्रीची आजपर्यंतची शारीरिक गुलामगिरी अन् ह्यापुढचें बौद्धिक दास्य ह्याची अंधुक कल्पना तिला आली. स्वतंत्र व्हायला, समर्थ व्हायला, सुखी व्हायला कांहीं निराळेंच करावें लागतें, ह्याचा अस्पष्ट अंदाज तिला आला. ही नवी दृष्टि प्राप्त झाल्यानें आतांपर्यंत बाळगलेल्या असूया, इच्छा, रागद्वेष–साऱ्या भावना बारगळूं पाहत होत्या...

आक्काला कांहींच सुचेना. उंबरठ्यावर राहून ती बाहेर पाहूं लागली. पण बाह्य जगाकडे तिचें चित्त लागेना. तिला रडावेंसें वाटलें. पण तिचे डोळे अगदीं कोरडे पडले होते. ह्या नव्या अवस्थेंत एकही अश्रु अवतार घेईना. कुणीही न रंगवलेल्या नायिकेसारखी तिची मनःस्थिति झाली...!

---

## तो आणि तो

६

कानपूरच्या फॅक्टरी एरियांतील सिंघानिया स्टील कंपनींत युद्धोत्तर योजना प्रचंड प्रमाणांत सुरू होत्या. कंपनीनें सर्वांआधीं अमेरिकेहून नवी यंत्रसामुग्री आणवली होती. कंपनीचे खास यंत्रविशारद बाबूराव रणदिवे यांना तेवढ्यासाठीं मुद्दाम मुंबईस पाठवलें. बाबूराव रणदिवे हे सरळ वृत्तीचे, कष्टाळू अन् कामांत जीव ओतणारे. कानपूरला स्थायिक झाल्यापासून गेल्या वीस वर्षांत त्यांच्या आयुष्यांत असामान्य प्रगति झाली होती. नोकरींत भराभर वाढ होत आज त्यांना मानाचें स्थान मिळालें होतें. खेरीज स्वतःचा बंगला नि मोटर, सुखी नि समृद्ध संसार—सारें मनाजोगतें !—ह्या कारणानें कंपनीनें त्यांना मुद्दाम मुंबईस यंत्राच्या व्यवस्थेसाठीं पाठविलें होतें. अन् ह्याच कारणानें बाबूराव काम आटोपून परत घरीं जायला उत्सुक होते.

एका हॉटेलांत ते जेमतेम उतरले अन् लगेच त्यांनीं कामाला सुरुवात केली. बंदरावर जाऊन डाग सोडवून घेतले. कस्टम ऑफिसांत त्यांचा जवळ जवळ एक दिवस गेला. अमेरिकन एक्सप्रेस कंपनीनेंही त्यांचा बराच

वेळ घेतला. मुंबईच्या काहीं यंत्रविशारदांशीं चर्चा करणें अत्यावश्यक होतें. नंतर बँकेचे व्यवहार, यंत्रांच्या विम्याच्या भानगडी–एक ना दोन. ह्या सगळ्या घोटाळ्यांत कंपनीच्या मुंबई शाखेंतल्या संपाची कटकट होतीच ! आठवडाभर बाबूराव रणदिव्यांची धांवपळ सुरू होती. मुंबईत त्याचें इतर काम नव्हतें व त्यांच्या कोणाशीं ओळखीही उरल्या नव्हत्या हें खरें; पण स्वस्थपणें एक जागीं बसायला त्यांना सवड सुद्धां सांपडली नाहीं. अर्थात् अशा विश्रांतीची त्यांना जरूरीही भासली नाहीं. सर्व काम सुरळीत होईपर्यंत त्यांना दुसरें सुचतच नव्हतें. यंत्राचीं धुडें धडपणें कानपूरची वाट चालूं लागलीं, त्या रात्रीं त्यांनीं सुटकेचा–समाधानाचा श्वास सोडला. त्यांना झोंप आली, तीही निराळ्या मोकळ्या मनःस्थितींत !–मोठें कर्तव्य केलें. आतां उद्यांचा दिवस मुंबईत मजेंत घालवून घरीं परतायचे !–उद्यांचा हक्काच्या सुट्टीचा दिवस भटकण्यांत घालवायचा, खरेदी करायची, चैन करायची ह्या स्वप्नांतच त्यांची रात्र गेली.

× × ×

दुसऱ्या दिवशीं बाबूराव रणदिवे जागे झाले तेही त्या गोड कल्पनेंतच !–आळसावून घोटाळणारी गोड सकाळ त्यांना मोठी सुखकारक वाटली. काम नाहीं, कटकट नाहीं, नुसतें सावकाशीनें सिगरेट ओढीत समोरची धांवपळ तिऱ्हाईतपणें पाहत राहायचें. ऊनऊन चहा घोटघोट घेत मुंबईचीं बातमीपत्रें चाळणें हेंही केवढें उन्मादकारक होतें. सावकाशीने दाढी, आंघोळ आवरून त्यांनीं उंची सूट चढवला, खिशांत चेकबुक ठेवलें अन् ते एका नव्या उत्साहानें बाहेर पडले !—

नेहमींच्या घाईनें बाबूराव रणदिवे मोठ्या चौकांत आले. ट्रॅमच्या माळा फिरत होत्या. लालचुटुक बसेस सुबक रस्त्यानें धावत होत्या. आजूबाजूला चित्रांतल्यासारख्या सुंदर टॅक्सीज् खड्या होत्या. आकर्षक मालानें गजबजलेलीं दिमाखदार दुकानें सजलीं होतीं. जिकडे तिकडे जी ती गोष्ट नटली होती नि स्वागताला सज्ज होती.

बाबूराव रणदिवे चौकांतच घोटाळून उभे राहिले. सभोंवार भिरभिरून पाहत राहिले. उत्साह वाटत होता, ओढ अनिवार होत होती. पण पाय

हालत नव्हते. कुठें जावें, काय करावें, हेच कळत नव्हतें. किती तरी वेळ ते बावचळून उभे होते. एकही बेत मनात रुजेना. त्यांना चमत्कारिक वाटलें. आश्चर्यही वाटलें. ही मुंबापुरी म्हणजे मायानगरी. पैशाला मोल नाहीं न् वेळाला ताल नाहीं ह्या जत्रेत!—अन् परप्रांतांतल्या महाराष्ट्रीयांना मुंबईबद्दल केवढा आपलेपणा!! त्यांतून शिक्षणासाठीं बाबूराव पांच प्रदीर्घ वर्षें मुंबईत राहिले होते—

बाबूरावाच्या मनात गोंधळ माजला. थोडीशी खिन्न छटा चेहऱ्यावर दिसूं लागली. नकळत त्याचीं पावलें शेजारच्या इराण्याच्या हॉटेलकडे वळलीं. चहाचे घोट घेत घेत ते मनाला टवटवी आणायचा यत्न करूं लागले.

पण चहा पिऊन झाल्यावर कुठें जायचें?—सारा दिवस कसा घालवायचा?—मजा करायची म्हणजे काय?—बाबूरावाच्या मनांत विचारांची गर्दी वाढली. शून्यपणें ते चहाच्या वाफेकडे पाहत राहिले. ह्या मुंबईत कुणी नातलग नाहींत, कुणी स्नेहीही उरलेले नाहींत. ज्या मुंबईत आपण—

बाबूराव दचकले. चहावरील वाफेचीं वलयें डोळ्यांवर साय धरीत आहेत, असें त्यांना वाटलें. त्यांनीं डोळ्यावरून बोट फिरवलें. डोळ्यांना टचकन् पाणी आले होतें. बाबूरावांना दचकल्यासारखें वाटलें. मग समजलें कीं, हृदयच एकाएकीं धडधडूं लागलें आहे. घामाघूम झालेला चेहरा पुसायचा त्यांनीं यत्न केला. टकलावरून आपला राठ हात फिरवीत सस्मित नजर करून त्यांनीं समोरच्या आरशांत पाहिलें.

पण काय आश्चर्य?–समोरच्या आरशांत एक तरुण आपलीं कोंवळीं बोटें कुरळ्या केसांत फिरवीत असलेला त्यांना दिसला.

बाबूराव रणदिवे भांबावले. आजूबाजूला कुणी बसलेलें नव्हतें. कुणीही तरुण नव्हता. पण आरशांतलें प्रतिबिंब ठळक होतें. बाबूराव धिटाईनें आरशांत पाहूं लागले. कुठें तरी हा चेहरा पाहिला आहे. फार वर्षांपूर्वी असलें पाहिजे. नाहीं तर कुठल्या तरी फोटोमध्यें तरी!

—तेवढ्यांत समोरच्या बसस्टॉपपाशीं बस वेगानें येऊन थांबली. बाबूरावांना दचकल्यासारखें वाटलें. आरशातलें प्रतिबिंब मान वळवून आतुरतेनें बसकडे पाहूं लागले. छातीवर एक हात घट्ट ठेवीत बाबूरावांनीं

वळून बसकडे पाहिलें. बसमधील गर्दी न् गोंधळ; अन् वरच्या मजल्यावर एक मुलगी बसलेली !!

बाबूराव विलक्षण दचकले. छातीवरचा हात जड होत खालीं कोसळला. भिरभिरणाऱ्या दृष्टीचा तोल पुरा सरला. स्वतःच्या स्थितीची, भोंवतालच्या काळाची, सारी–सारी जाणीव नाहींशी झाली !—मोहमयी मुंबानगरी जत्रेतल्या चक्रासारखी गरगर फिरली. ह्या जत्रेकडे पाहताच अचानक आलेली खिन्नता, डोळयाला टचूदिशीं आलेलें पाणी, मान वळवून रस्त्याकडे पाहताना नजरेंत ओमडणारी आतुरता, हृदयाचा थरकांप न् बसची धडधड, बसस्टॉपपासची गडबड न् बमभले माणूस—अन् केसावरून हात फिरवीत वाट पाहणारा हा तरुण जीव ! वीस वर्षे झालीं, नीरा तलंगची वाट पाहत रोज उभें राहायचें हेंच ते आपले संकेतस्थळ !!

आजवर दडल्यादबल्या गेलेल्या भावना खळबळून वर आल्या. ज्या नाजुक भावना कठोरपणें मागें टाकल्या, ज्या आशा–आकांक्षा चुरडून कोसळल्या गेल्या, त्या साऱ्या अचानक पिंगा घालूं लागल्या. मधल्या कालखंडाची कल्पना नाहींशी झाली. प्रीतीच्या असफलतेची जाणीव उरली नाहीं. प्रमागमाच्या चाहुलीची स्मृति स्मरेना नि प्रेमभंगाच्या वेदनाची याद येईना. नीरा तलंगचे प्रणयाराधन करीत मुंबईत लुटलेले मादक क्षण मात्र भिरभिरूं लागले......

अन् मग हळूहळू कल्पना स्फुरली. धीर आला. धीटपणें बाबूरावांनीं आरशातल्या प्रतिबिंबाकडे पाहिलें. डोळयावरचा चष्मा काढून खिशांत टाकला. ह्या काळयाभोर नेत्रावर तर नीरा भाळली होती. अन् हा टाय कशाला ? पायजमा, ब्लेझर घालणाऱ्या कॉलेजयुवकाला हे शोभणार कसें ?–नीराला सिगरेट आवडत नाहीं हें आठवल्यावर त्यांनीं सिगारेट फेकून दिली. आरशात नाजुक हसून पाहिलें. आरशातल्या चेहऱ्यासारखेच आपण आतां दिसूं लागलों. ' बाबू रणदिवे, झेविअर्स कॉलेज, मुंबई.'

तेवढ्यांतच बस आल्याचा आवाज आला. बाबूराव भांबावले. बसची वेळ झाली की मनगटावरील घड्याळ ऐटींत पाहायची त्या वेळची संवय. आज मनगटावर घड्याळाच्या पट्टयाचीही खूण नव्हती. बाबूराव वरमले.

अवसान आणून त्यांनीं खिशांतलें सांखळीचें घड्याळ मनगटावर टेकवीत वेळ पाहिल्याप्रमाणे केलें. अन् घड्याळ परत खिशांत कोंबीत ते उठले. कॉलेजकुमाराच्या चपळाईनें व आतु'तेनें ते बसकडे धांवले.

वरच्या मजल्यावर दृष्टि गेली. बाबू असाच वर पाहत असे. धक्का-बुक्कींत ते बसमध्यें चढले. वरती जाऊन बसले. शेजारीं पारशी बाई बसली होती. बस चालू झाल्यावर तिच्या उघड्या मांसल दंडाचा स्पर्श झाला. नीरा अशीच खेटून बसत होती. केवढा चोरटा उन्माद तो !—

हा कंडक्टर. नेहमींच्या माहितीचा. तरी नेहमीप्रमाणें त्यानें विचारणा केली. पैसे पुढें करीत बाबूराव म्हणाले, "चौपाटी दोन ! !—नाहीं, नाहीं एक !"

चौपाटीचें तें एकच तिकीट घेतांना बाबूरावांचें हृदय दुखावल्यागत झालें. तेवढ्यांत जवळची पारशीणही उठून गेली. खिडकीजवळ सरकून बाबूराव बाहेर पाहूं लागले......

अन् मग बस चालू झाल्यावर सुरू होणारी नीराची ती बडबड !—'बाबू ती पाटी पाहिलीस कां—अन् हा इकडे आमच्या आक्काच्या गाण्याचा क्लास आहे ! अय्या, सुलोचनेची फिल्म आली आहे कीं—बाबू ते बघ प्रोफेसर डिसूझा–अन् बाबू—'

सारी लडिवाळ बडबड ओळीनें धांवूं लागली. बस कुठे तरी थांबली. अचानक नाण्याचा झंकार आला. बाबूरावांनी बाहेर पाहिले; पण लगेच आठवण आली. ह्या ठिकाणीं एक आंधळा बसत असे अन् नीरा नेमानें त्याला आणेली देत असे. आज आंधळा नव्हता; अन्—! आणेलीच्या आवाजानें बाबूरावांचें हृदय भरून आलें. पावसाचे थेंब टपटप वाजावेत तसा नाण्यांचा आवाज ताल धरल्यासारखा सारखा येत राहिला.

अन् मग चौपाटी आली. कंडक्टरनें आठवण केल्यावर हा बाबू रणदिवे भानावर आला. घाईनें उतरला. नीरा नेहमीं भरकन् उतरते व झपझप चालते. जाणाऱ्या येणाऱ्या मोटर गाड्यांचें भयही बाळगीत नाहीं. पण त्यामुळें बाबूला केवढें घाबरल्यासारखें होतें ! बाबू तशा भीतीनें रस्ता ओलांडूं लागला. चालण्याचा वेगही नकळत वाढला. ह्या गर्दीत नीराची

अन् आपली चुकामूकही व्हायची !—छे छे, नीरा जरासुद्धा दूर-दृष्टीआड गेलेली सहन होण्यासारखें नव्हतें. नीरा नसली तर मग जिवंत तरी कसें रहायचें ?—नीराखेरीज आयुष्य फोल आहे ! व्याकुळतेनें बाबू झपझप चालूं लागला. समोरच्या फूटपाथवर निळ्या काठाचें पांढरें पातळ नेसून एक तरुणी चालली होती. नीराचे तें आवडतें नेसूं !-त्या पातळाच्या दिशेनें बाबू रणदिवे धांवला.

पाहतां पाहतां पांढरें पातळ कुठें तरी नाहींसे झालें. बाबू रणदिवे बावचळून पाहत राहिला. निळ्या काठासारखी निळी पाटी एका जागीं दिसली. ‘ आइस्क्रीम ’ ! पांढरें शुभ्र फेसाळ आइस्क्रीम नीराला विलक्षण आवडे. “ नीरा, वेळीं-अवेळीं किती खायचं आइस्क्रीम ? घसा खराब होईल तुझा बरं !—चल आत ! ”—

फक्त स्त्रीपुरुषांसाठींच असणाऱ्या खास खोल्यात बाबू रणदिवे गेला. दोन प्लेट आइस्क्रीमची ऑर्डर गेली. एक प्लेट समोर ठेवून दुसरी प्लेट सावकाशीनें खाण्यास सुरुवात झाली. मधून दाराच्या फटींतून बघायचा चाळा. नीराला खेटून आपण बेभानपणें बसलों आहोंत, हें कुणाला दिसत तर नाहीं ना ?—अन् मग अस्पष्ट आवाज. खुर्ची सरकवल्याचे, कुजबुज केल्याचे, आणिकही कसले कसले......

× × ×

मग चौपाटीच्या एका शांत टोंकाला वाळूच्या पटावर बाबू रणदिवे बसला. ह्या वाळूंत संगमरवरी पुतळ्याप्रमाणें नीरा नि बाबू स्तब्धपणें—शून्यपणें बसत. समोर समुद्राच्या उचंबळणाऱ्या लाटा, क्षितिजाच्या वेड लावणाऱ्या कडा, जिकडे तिकडे काव्य भरलेलें !—पाठीमागें आनंद उधळणारे रंग, प्रणयाने गजबजलेलें जग, उन्मादाचें भरघोष जीवन !—बाबूच्या बंद नेत्रांपुढें सारे क्षण खडे झाले. अंग रोमांचानें फुलून निघालें. आयुष्य परिपूर्ण झाल्यागत वाटणारा आनंद. प्रेमाची ही समाधि !—क्षितिजावर टेकलेल्या सूर्याची साक्ष ठेवून घेतलेली प्रेमाची शपथ आठवली. ती अमर–अपूर्व प्रीति ! !—उल्हसित मनानें भावी सहजीवनाची रंगवलेलीं स्वप्नें स्मरलीं. केवढें आदर्श जीवन ते !-‘ नीरा ! आपलीं दोघांचीं हृदयें

अखंड सांधलीं गेलीं आहेत आतां !—काय वाटेल तें झालें तरी आपलें प्रेम अभंगच्च राहील. तूं माझी नि मी तुझा !—तुझ्याशिवाय जगणं अशक्य आहे. तुझ्या अखंड सहवासांत ऊर्वरित आयुष्य—नीरा—नीरा !—'

बाबूचा हात कुणी तरी ओढला. नीरा त्याला उठवीत होती खास !—प्रीतिवचनांच्या उच्चारानें तिचें मुखमंडळ लाजेने न्हाऊन निघालें होते. प्रेमाच्या साक्षात्कारानें तिची काया थरथरत होती. बाबूला उठवीत ती म्हणाली, '-चल-त्या डोंगरावर जाऊं—बागेत भटकूं !—मला सुचेनासं झालं आहे. आज तुला जीवन अर्पण केलं—आयुष्य वाहिलं आहे. जन्मोजन्मीं तोच पुरुष कां हवासा वाटतो, हे उमगले आहे मला !—तूं माझा आहेस हे जगाला कळायची फार इच्छा आहे. पण त्याआधी ह्या बागेतल्या फुलाना आपलं गुपित सागूं !—पोपटाना-चिमण्याना पढवूं !—ये तरी—आयुष्यातला हा अपूर्व अन् अमर क्षण...! '

डोंगरमाथ्यावरील ते शंकासूराचें झाड बाबूनें जवळ जातांच ओळखले. ह्या दिवसांतही तें फुललें आहे—लाल झाले आहेसें स्पष्ट वाटलें. गुलाबांच्या त्याच अर्धस्फुट कळया, डेलियाचे रंगीत गेंद, हीना चमेलीच्या वाफ्यांत फुललेली अत्तराची आई, सुंदर जलाशयांत विहार करणाऱ्या कमलकुमारिका अन् झाडावरून लपून फिरणारे पक्षाचे लबाड थवे ! साऱ्यानीं तें गुपित ओळखले होतें....नीरा तेलंग नि बाबू रणदिवे ! !—

सागराच्या साथींत, वनश्रीच्या आश्रयानें, प्रीतीचे क्षण चार नेत्रांनीं भरून लुटले !—ते क्षण अन् त रोमांच अखड आहेत-अमर आहेत, ह्यात काय संदेह !—बागेतल्या कोपऱ्याकोपऱ्यात बाबू भटकला. सारे आठवले. आठवण्यासारखे सारेंच होतें !—

× × ×

अन् त्या मधुर प्रवासांत कांही क्लेशकारक आठवणी आल्या. नीरा एकदम थबकून म्हणाली, ' ह्या रस्त्यानें नको !—इकडे आमच्या बाबाचे एक मित्र राहतात. त्यांनीं पाहिलं तर '—बाबू चालतां चालता थाबला. समोरच्या कांहीं इमारतींकडे त्यानें धसक्यानें पाहिले अन् मग परत फिरून दुसऱ्या दूरच्या रस्त्यानें तो चालूं लागला.

किती तरी वेळ बाबू झपझप चालत होता. कसल्याशा शंकेने मन थरथरत होतें. हृदय प्रीतिच्या वर्षावानें न्हाऊन निघालें होतें. नीरा जवळून चालत असल्याची जाणीव अखंड होत होती. तिचा स्पर्श, तिचा स्वर, स्पष्ट येत होता. पण हें नवें स्पंदन!—शंकेचें न् काळजीचें!—घरीं पोंचायला उशीर झाल्यावर नीराला रागावतील घरचे लोक! समुद्राच्या पाण्यानें तिचे भिजलेले ओचे अजून वाळले नव्हते. लोकांच्या दृष्टीचा-टीकेचा हा कसला जाच! सर्व संकटें उल्लघून आतां विवाहाचा बेत पार पाडायला हवा!

लोकापवादाच्या त्या धास्तींतच फोटोची स्मृति आली.

ट्रॅम गाठून बाबू गिरगांवांतल्या फोटो स्टूडिओपाशीं आला. शिणल्या नजरेनें दुकानादुकानातून पाहूं लागला. स्टुडिओंत दोघांनीं गंमतीनें फोटो काढून घेतला होता. विरहाचे व्याकूळ क्षण विसरताना त्या प्रतिमेने विरंगुळा वाटे. पण त्या दुकानदारानें तो फोटो दर्शनी कांचेंत जाहिरातीसारखा लावला. अन् सर्वत्र प्रीतीची जाहिरात झाली.

कुठल्याच दुकानांत तो फोटो बाबूला दिसला नाहीं. त्याला बरें वाटले. आपल्या सांगण्यावरून तो फोटो काढला गेला तर! आतां कुणी आपल्या दोघांच्या फोटोकडे बोटें दाखविणार नाहीं. कुणाची दृष्ट लागणार नाही.

ती दृष्ट—लोकांची ती टीका!—बाबूचे हृदय जोरानें धडधडूं लागलें. प्रीतीच्या पायघड्या इतक्या विरविरीत असतीलसें वाटलें नव्हतें. बाबूच्या पायाला पेटके आले. हृदयही दमून गेलें. नीरा जवळ नाहींसे वाटलें. खरेंच कशी असणार?—ह्या संकटांनी ती दबून गेली आहे—बिथरली आहे. प्रेमाची परिणति होईल कीं नाहीं याचाच संदेह आहे. तेवढ्यासाठींच अखेरचें बोलणें करायला तिनें महालक्ष्मीवर बोलावलें आहे.

बाबू रणदिवे महालक्ष्मीकडे निघाला. घाईनें निघाला. सारें अंग घामाघूम झालें होतें. नीरा नकार देईल का?—इतकें सारें ठरलें असून! छे—असं कसं होईल! आपलें स्वर्गीय प्रेम!!—

× × ×

बसमध्यें अण्णा वाकनीस दिसला. ह्यानेंच नीराच्या बाबाजवळ प्रथम चुगली केली. बाबूनें अण्णाकडे रागाने बघितलें. त्याच्या मुद्रेवर कांहींच

भाव नव्हता. दांतओठ खात बाबू म्हणाला, ‘ बदमाष !–अण्णा वाकनीस ना रे तूं ! ’–तो तरुण चकित झाला. कसाबसा म्हणाला, ‘ नाहीं. त्यांचा मुलगा मी !–’ बाबू चमकला. काय बेरड आहे ! पण तेवढ्यांत महालक्ष्मीचा मार्ग आला. वाकनीसला सोडून तो उतरला.

ठरल्या जागीं हिरवळीवर नीरा उभी ! किती मोहक न् आकर्षक ! ह्याच आकृतीसाठीं जीवाची कुरवंडी केली. अन् ही आतां दुरावणार !–नुसता विचारही दुस्सह वाटतो !–बाबू धांवतच गेला. झाडाखालीं बसला. फांशीपेक्षांही जलाल वाक्यें नीराच्या तोंडांतून आलीं. बाबूचें हृदय चिरलें गेलें. एक असहाय उद्‌गार त्याच्या जिव्हणीबाहेर घरंगळला अन् मग दांतांच्या कण्या करून नीराच्या विनवण्या. हातावर शीर घेतलेले जणूं ! छाती फाडून प्रेम उघडें केलेलें. त्या प्रेमाला मूठमाती मिळणार ह्या जाणीवेसरशीं सर्वत्र अंधकार दिसला. आग भासूं लागली. जीवन संपल्यागत वाटलें. दोरी तुटून मालेंतले मोती ओघळावेत तशी प्रेमभरी नजर तुटून आशेचे शब्द निखळूं लागले. “ नीरा, आपलें प्रेम !—कसा ग जगूं तुझ्याशिवाय ! तूं माझं सर्वस्व आहेस. मी सामान्य अन् मी दरिद्री म्हणून दूर नको जाऊंस !—आयुष्यांत तुला निदान दुःख तरी देणार नाहीं...एकमेकांच्या संगतींत अश्रु ढाळण्यांतच सहजीवन असतं...तें बघ छोटं घर—तें जोडपं तीं कच्चींबच्चीं—कसं आदर्श, सुखी घरटं आहे—तसं बांधूं आपण !—नको जाऊंस दूर !—तूं गेलीस तर माझं आयुष्यच आटोपेल ! !—”

हळूहळू वाक्येंही अस्पष्ट झालीं. नीरा अदृश्य झाली. सर्वत्र अंधार पसरला. सारें हीनदीन झालें—शून्य झालें !—

प्रेमभंगाची ती आग न सोसून बाबूनें डोळे घट्ट मिटून घेतले.

× × ×

किती तरी वेळानें डोळे उघडले गेले. सभोंवतालचें दृश्य पाहतांच चमत्कारिक वाटूं लागलें. हिरवळीवरून हळूहळूं दृष्टि समोरच्या छोट्या घराकडे गेली. तें जोडपें, तीं कच्चींबच्चीं, आदर्श सुखी घरटं !—रणदिवे निरखून पाहूं लागला. खरंच छान घर आहे. आपल्या घरासारखं ! !—विणकाम करीत बसलेली ती गृहिणी—आपल्या पत्नीप्रमाणंच. अन् तो पुरुष !—

सोनेरी फ्रेमचा चष्मा, चकचकीत टक्कल, अन् तोंडांत सिगरेट—ह्या थाटांत! एकदम दचकून बाबूराव रणदिवे उठले. आपण इकडे महालक्ष्मीच्या बाजूला कसे आलों, समजेना! डोळ्याला चष्मा नव्हता ह्याचें आश्चर्य वाटलें. खिसे चांचपून त्यांनीं चष्मा काढला. चाळीशी लावून पुन्हां चकितपणें पाहिलें. पुन्हां बेचैनी! भुंड्या गळ्याला टाय बांधला, सिगरेट पेटवली, अन् कुठें वेड्यासारखें भरमसाट भटकत राहिलों ह्याचा विस्मय करीत ते उभे राहिले.

हृदय अगदीं दमून गेलें होतें. कसलाही विचार करायचें त्राण नव्हतें. इच्छा नव्हती. समोरचा संसार पाहण्यांत मात्र सुख होतें. पोक्त इसम, त्याची समाधानी पत्नी अन् तीं गोड लेकरें!—एकदम बाबूराव रणदिव्यांना आठवण आली. पत्नीनें केवढी मोठी यादी दिली होती सामानाची! स्वयंपाकांतलीं भांडीं, थोडेंसें कापड, कशिद्याचें सामान, कुड्यांचें डिझाइन. अन् अरुणला मेकॅनो आणून द्यायचें कबूल केलें होतें. बेबीला साडी नेसलेली मोठी बाहुली. बाबूराव रणदिव्यांनीं टॅक्सी बोलाविली. पुरोहितकडे ते जेवले. घरच्या जेवणाची आठवण करीत त्यांनीं तें बाजारी अन्न कसेंबसें खाल्लें. मग फोर्ट, क्रॉफर्ड मार्केट, ग्रॅन्टरोड—केवढी मोठी खरेदी! पत्नीला अरुणला, बेबीला–साऱ्यांना खूष करायचा बेत होता. स्टेशनवर त्यांनीं तिकिट रिझर्व केलें. अन् पहिल्याच गाडीनें ते निघाले. नवीन मशिनरी जाऊन पडली असेल. तिची व्यवस्था आपल्याच हातानें व्हायला हवी ही आतुरता. बायको न् पोरांना अगदीं करमेनासें झालें असेल ही ओढ!—आपलं काम व्यवस्थित संपलें ह्या समाधानांत अन् आपण आपल्या जगांत जाणार ह्या आनंदांत बाबूराव रणदिव्यांनीं मुंबई सोडली.

— —

## पुरुषांची गोष्ट

## ७

तात्या गोडसे, कमलाकर नाडकर्णी आणि रंगनाथ गुर्जर. हॉटेलच्या छोट्या खोलींत त्या तिघां तरुणांना कसेंबसें सामावलें होतें. एकाद्या थिएटरमध्यें अनोळखी लोकांनीं जवळ जवळ बसून खेळ पाहायचा— अगर आगगाडींत चार ठिकाणच्या लोकांनीं एकत्र बसून काळ कंठायचा— त्यांतलाच हा प्रकार!—तशांत सकाळपासून झिमझिम पाऊस पडत असल्यानें बाहेर मोकळेपणानें हिंडायचीही सोय उरली नव्हती. त्या अडगळलेल्या खोलींत तिघेही जण सारा वेळ अवघडून वेळ काढीत होते.

तात्या खिडकींतून बाहेर पाहत होता. पावसामुळें रस्त्यावरची रहदारी आंवरलेलीच होती. समोर एक मोठा वाडा होता. त्याच्या बाजूलाच एक मोठें प्राजक्ताचें झाड होतें. पावसाच्या पाण्यानें तें पुरें भारावलें होतें. वाडयाचीं बहुतेक दारें पावसाच्या माराच्या भीतीनें ओढून घेतलेलीं होतीं. कोपऱ्यांतली स्वयंपाकगृहाची खिडकी मात्र उघडी होती. त्या खिडकीच्या चौकोनाकडे तात्या पाहत होता. त्या चौकटींतून एका तरुणीची स्वयंपाक करतांना चाललेली लगबग अधूनमधून दिसे. फळीवरचा डबा काढतांना अगर कांद्या–बटाट्याच्या साला बाहेर टाकतांना हातांतल्या गोठपाटल्या

चमकत. कपाळावरच्या बटा सांवरतांना ती दिसे. प्रत्येक वेळीं ती विलोभनीय वाटे. अन् सात्त्विक सुद्धां. त्या आकृतीकडे तात्या पाहत उभा होता.

कमलाकर कोपऱ्यांतल्या एकुलत्या एका आरामखुर्चीवर वाचीत पडला होता. एक प्रदीर्घ प्रेमकथा. त्याच्यासारख्या कॉलेजयुवकांना वेड लावील अशा वर्णनाची न् पद्धतीची. जणूं काय त्याच्यावरच ती कादंबरी लिहिली होती. नायकाचीं वर्णनें वाचतांना हर्षभरानें तो जवळच पडलेल्या आपल्या बॅडमिंटनच्या रॅकेटवरून बोटें फिरवी. प्रेमप्रसंगांचीं पानें चाळतांना तो अधिक आसासून बसे. वाचनांत वेळ कसा जात होता हें कळतही नव्हतें.

रंगनाथ गुर्जर कॉटवर-स्वप्नसृष्टींत विहार करीत झोंपला होता.

बराच वेळ गेला-बराच वेळ गेला-अन् मग पाऊस थांबला. जिकडे तिकडे दिवे लागले. टवटवीत अन् मोकळें मोकळें वाटूं लागलें. पोटांत भूकही भासूं लागली. तात्यानें खोलीतला दिवा लावला. एक लांबसा आळस देऊन कमलाकरनें कादंबरी दूर टाकली. दिव्याच्या उजेडानें न् कमलाकराच्या हालचालीनें रंगनाथ जागा झाला व उठून कॉटवर बसला.

तिघांनीं एकमेकांकडे हंसून पाहिलें. परिचय आधींच झालेला होता. हवापाण्याच्या गप्पाही आधींच झालेल्या होत्या. आतां एकमेकांनीं आपापली माहिती सांगायला सुरुवात केली. तात्या एका ऑफिसांत नुकताच चिकटलेला कारकून, कमलाकर कॉलेजमधला वीर आणि रंगनाथ एका मालगुजाराचा मुलगा. तिघेही भिन्नभिन्न जगांतले. पण म्हणूनच प्रत्येकाला सांगण्यासारखें खूप होतें. तिघेही गप्पांत वाहून गेले. एखाद्या थिएटरमध्यें जवळ जवळ बसलेले प्रेक्षक एकाच भावनेनें भारले जातात-तसे. आगगाडींतले प्रवासी एकत्र कुटुंबांतल्या मंडळीप्रमाणें वागतात,-तसे. त्या हॉटेलच्या खोलींत ते तिघे एकदिलानें सुखदुःखाच्या गप्पा मारीत बसले होते.

× × ×

जेवण आटोपल्यावर पान चघळीत रंगनाथ म्हणाला, "आता झोंपणार कीं काय?-आपल्याला तर कंटाळा आला बुवा! चला बाहेर भटकायला. स्वच्छ झालंय् सारं आतां!—चला, जरा मजा मारूं या!"

रंगनाथच्या बोलण्याचा आशय अर्धवटपणें दोघांना समजला. रंगनाथ-बरोबर भटकायला कमलाकर उत्सुक होता. तात्यालाही जरा कुतूहल होतेंच. तिघेही कपडे करूं लागले. रंगनाथनें आपला नवा रेशमी कोट चढवला. सोन्याचें घड्याळ बांधलें. अत्तराचा फाया कानांत अडकवला. अन् छडी हातीं घेत तो म्हणाला, ' चला दोस्तांनो ! '

रस्त्यावर आल्यावर रुबाबांत रंगनाथनें गाडी बोलावली. गाडीवानाच्या कानांत तो हळूच कुजबुजला नि मग रंगेलपणें हंसला. गाडीवानानें अदबीनें गाडीचें दार उघडलें. आपल्या मित्रांना बोलवीत रंगनाथ डौलानें आंत बसला. त्याचा चेहरा खुलला होता. डोळ्यांत एक प्रकारच्या धुन्दीचें धुकें भरलें होते. ' दुनिया दिवानी ' कीं असलेंच कुठलेंसें गाणें गुणगुणत त्यानें गाडी वेगानें सोडण्याचा हुकुम केला.

कमलाकर रंगनाथला जरा चिकटून बसला. जसे कांहीं ह्याचे आपण जुने दोस्त आहोंत. कमालीच्या कुतूहलानें त्याचें मन भारावलें होतें. डोळे इकडे-तिकडे भिरभिरवीत दिसतील तीं नवीं चित्रें तो टिपून घेत होता.

तात्याला मात्र गाडीबाहेर बघायची शरम वाटत होती. आपल्याला कोणी बघेल कीं काय, ह्या शकेनें तो कोंपऱ्यांत अंग चोरून बसला होता. त्याच्या छातींत धास्तीचा भला मोठा गोळा उठला होता न् गाडींतून उडी मारून पळून जावें असें त्याला तीनतीनदां वाटत होतें.

कुठल्या तरी लांबलांबच्या रस्त्यानें कसल्याशा विचित्र वस्तींत गाडी शिरत होती.

तात्याला वाटलें, ' छे—किती किळसवाणें कृत्य हें !—आपली संस्कृति काय, जीवनाचें ध्येय काय—अन् कसले हे प्रकार चालले आहेत जगांत—छे छे ! –' तेवढ्यात कमलाकर कुजबुजला, ' नको बुवा, आपला धीर होत नाहीं. ' रंगनाथनें तें अस्पष्ट ऐकलें. तो म्हणाला, ' उंः–हीच तर आयुष्याची खरी गंमत आहे. हाच खरा पुरुषार्थ आहे ! '

बोलतां बोलतां त्यानें गाडी थांबवायला सांगितली. तिघेही उतरले अन् थोड्याच वेळात जिना चढून एका खोलींत आले.

आपल्या मित्रांसमवेत रंगनाथ कोचावर बसला. रेशमी रुमालानें कृत्रिम

वारा घेत खोटें हंसून तो समोरच्या वृद्धेला म्हणाला, "काय–कांहीं नवं पाखरूं ?—"

वृद्धेनें पानदान पुढें ओढलें अन् ती पान बनवीत म्हणाली, "आहे ना तुमची कमला—"

रंगनाथ म्हणाला, "ती धारवाडची ?-छे, ती फार लठ्ठ झाली आहे आतां. कुणी नवीन नाहीं कां छोकरी ?–नवीन. गोरीशी अन् चुणचुणीत ?–"

म्हातारी कांहींच बोलली नाहीं. तिनें पट्ट्या करून तिघांना दिल्या. मग सावकाशीनें ती म्हणाली,

"एक आहे–पण पैसे फार पडतील—कुसुम, ए कुसुम—"

आंतल्या खोलींतून क्षणार्धात एक मुलगी बाहेर आली. गोरी नि चुणचुणीत. कृत्रिम सौंदर्यसाधनांनीं चेहरा भरलेला होता. डोळ्यांतले लबाड भाव होते तेही सारे खोटे वाटत होते.

रंगनाथनें टक लावून तिला न्याहाळून घेतलें. मग एका कोपऱ्यांत जाऊन तो वृद्धेशीं कांहीं बोलूं लागला.

भिंतीवरील शृंगाररसाचीं पौराणिक चित्रें पाहण्याचें ढोंग करीत कमलाकर वेळ काढीत होता. त्याच्या मनांत अनेक नवे नि चमत्कारिक भाव अर्धवट येऊन जात होते. समोरचा तमाशा जंगली व राक्षसी वाटत होता त्याला. जग किती पुढें गेलें आहे, स्त्रियांना सर्वत्र समानता कशी प्राप्त झालेली आहे, हें वाचलेलें–पाहिलेलें त्याला आठवत होतें.

तात्याला चित्रांकडे पाहण्याइतकेंही अवसान उरलें नव्हते. अंग घामानें फुललें होते न् हृदयाचें पाणी पाणी झालें होतें. पूजनीय स्त्री-जातीची, आपल्या बहिणींची ही विटंबना पाहून त्याचे डोळे भरून आले होते.

त्या तरुणीला घेऊन, खरें जीवन जगणारा रंगनाथ आंतल्या खोलींत गेला होता.

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बऱ्याच उशीरानें ते तिघेही जण जागे झाले. रात्रीच्या जागरणाचा शीण तिघांच्याही डोळ्यांत तरंगत होता. हळूहळू त्यांनीं

अंथरुणाचा त्याग केला. चहा ढोसला अन् दाढया करून ते आंघोळी आटोपूं लागले.

रंगनाथला अजूनही आळसल्यागत वाटत होतें. आंघोळ झाल्यावरसुद्धां तो पलंगावर लवडला. केंस विंचरून, पोमेड पावडर पेरून झाल्यावर कालची कादंबरी घेऊन कमलाकर खुर्चीत घुसला. तात्या ओल्या पंचाचा पिळा खांद्यावर टाकून खिडकींत उभा राहिला. त्यानें रस्त्यावर पाहिलें. तेवढयांत खालून जाणाऱ्या एका पोक्त इसमानें त्याला खुणावलें.

तात्या ओरडला, "या-ना, वर या!"

तो इसम खोलींत आला. तात्यानें त्याची मित्रांशीं ओळख करून दिली. "हे माझ्या वडिलांचे स्नेही. ह्यांनींच दोन चार स्थळें सुचविलीं आहेत. त्या मुली पाहायलाच—"

तो इसम मध्येंच म्हणाला, "मग तुम्ही सर्वच चला ना!–नवऱ्या मुलाबरोबर मित्र असले म्हणजे बरें असतें. वधूपरीक्षा नीट होते."

तात्यानें धोतराचा काचा खोचला. ठेवणींतला कोट घातला व घडीची टोपी हातीं घेत दोघां दोस्तांना म्हणाला, "चला ना!—"

रंगनाथला मुली पाहण्याचें कुतूहल होतेंच. वधूपरीक्षा असते तरी कशी, पाहतात म्हणजे काय, अन् विचारतात तरी काय, हें समजून घ्यायची उत्सुकता होती. तात्याचें न् त्या इसमाचें संभाषण ऐकत तोही निघाला.

कमलाकरला कसेंसेंच वाटले. कुठले तरी राक्षसी व रूढिप्रिय शरीरसंबंध जुळवायला जायचें! आग्रह झाला म्हणून तो नाइलाजानें निघाला.

तिघेही बाहेर पडले. त्या इसमाबरोबर तात्या सभ्यतेनें, प्रतिष्ठेनें चालला होता. आयुष्यात कांहीं तरी महत्त्वाची मंगल घटना घडणार आहे ह्या पवित्र विचारांचें वलय त्याच्या भोंवतीं वावरत होतें.

रंगनाथ तात्याच्या बरोबरीनें चालला होता. अन् आपुलकीनें बोलत होता. जणूं काय, नवऱ्या मुलाचाच नातेवाईक तो!

कमलाकर मात्र ह्या तिघांपासून दूर अंतरावर चालला होता. ह्या कर्मठ व जुनाट प्रकारांत सामील न होतां निघून जावेंसें त्याच्या मनांत येत होतें.

बराच वेळ चालल्यावर मध्यम स्थितींतल्या वस्तीत शिरून एका सभ्य गृहस्थाच्या दाराशी ते आले.

बरोबरीच्या इसमानें म्हटलें, " मग ती धारवाडी मुलगी आधीं पाहायची नाहीं ना ?—"

तात्या म्हणाला, " कोण, ती विमला ना ? नको, फोटोवरून लठ्ठ वाटते. खेरीज हुंड्याच्या बाबतींतहीं—"

तिघेही घरांत शिरले. वधूपिता वाटच पाहत होता. त्यानें सर्वांचें स्वागत केलें. चहाचे पेले रिकामे झाले अन् मग वधूपित्याने मुलीला हाक मारली,

" कुसुम, ए कुसुम—"

आंतल्या खोलीतून क्षणार्धांत एक मुलगी बाहेर आली. गोरी नि चुणचुणीत ! कृत्रिम सौंदर्याने चेहरा भरलेला होता. डोळ्यांतले शालीन भाव सारे लटके वाटत होते.

तात्यानें टक लावून तिला न्याहाळून घेतलें. मग जवळ पडलेल्या पुस्तकांतला उतारा तिला वाचायला सांगितला.

भिंतीवरील कुटुंबीयांचीं चित्रें पाहण्याचें सोंग करीत रंगनाथ वेळ काढीत होता. समोरचें नाटक त्याला जंगली व अमानुष वाटत होतें. कसल्या अजाण अन् गोगलगायी मुलीचे खेळ केले जात होते ! असे जुळवलेले विवाह कसे राक्षसी ठरतात हें त्यानें पाहिलेलें होतें.

कमलाकरला इकडेतिकडे पाहण्याची इच्छाही उरली नव्हती. तो निरिच्छेने अवघडून बसला होता. समाज अजून आहे तेथेंच घोटाळतो आहे अन् स्त्रीजातीची सभ्यपणें भिड निघत आहे हें पाहून त्याच्या भावनांचें पाणी पाणी झालें होतें. आपल्या बहिणींची विटंबना पाहून त्याच्या नेत्रांत खिन्न छटा भरली होती.

त्या मुलीसह सुखाचा संसार थाटूं इच्छिणारा तात्या वधूपित्याशीं चर्चा करीत होता.

× × ×

दुपारची हॉटेलमधली फीस्ट आटोपल्यावर रंगनाथ पलंगावर आडवा झाला. कुठल्या तरी लावणीचा चरण गुणगुणत तो छतावरील नक्षीकाम

निरखीत होता. सुपारी तोंडांत टाकून अन् दोन तीन पत्रिका हातांत घेऊन तात्या खिडकींतून समोरच्या घराकडे पाहत उभा होता. कमलाकर मात्र विसावा न घेतां आपल्या रॅकेट्स् साफ करीत होता. इथल्या कॉलेजबरोबर मॅचिस् खेळायला तो आला होता.

रंगनाथनें विचारलें, " काय-आज मॅच आहे काय तुमची ? "

कॉलेजचा क्रेस्ट असलेला कोट चढवीत कमलाकर म्हणाला, " नाहीं- मॅच परवां आहे. पण माझा आपोनंट आज एक मॅच खेळणार आहे. त्याचा खेळ पाहायला हवा ! खेरीज थोडं खेळायला मिळालं तर हातही मोकळे होतील जरा. काय, येतां का बरोबर ? चला हो गोडसे ! "

तात्यानें आंत दृष्टि वळवली. कॉलेजच्या वातावरणाबद्दल त्याला गूढरम्य कुतूहल होतें. तेथील गंमती पाहायला तो अति उत्सुक होता. त्यानें शक्य तितका नीटनेटका पोषाख केला व रंगनाथला म्हटलें, " चला हो ! "

रंगनाथ अगदीं आळसावला होता. ह्या छाकट्या मुलामुलींच्या कचक- ड्याच्या कॉलेजांत जायची त्याची इच्छा नव्हती. मोठेंमोठें बोलणें न् खोटेंखोटें हंसणें ! सारें कृत्रिम व पोकळ ! रंगनाथ तितकासा तयार नव्हता. पण खोलींत एकटें कुठें बसायचें म्हणून तोही निघाला.

भाड्याच्या सायकली घेऊन तिघेही निघाले. कमलाकर सर्वांच्या पुढें होता. एकाद्या हीरोसारखा रॅकेट फिरवीत न् केस सारखे करीत तो डौलानें चालला होता. जणूं काय नंदनवनांतच तो युवराजासारखा शिरत होता.

कमलाकराच्या शक्य तितक्या जवळून सायकल चालवण्याचा तात्या प्रयत्न करीत होता. इतर बाबतींतही त्याची नक्कल सुरू होती. जणूं तोही कुणी कॉलेजकुमारच !

ह्या दोघांच्या मागून आळस झाडीत रंगनाथ पॅडल मारीत जात होता.

बराच रस्ता काटल्यावर एका मैदानासमोरच्या भव्य इमारतीपाशीं ते आले.

तिघांनीं सायकली ठेवल्या अन् ते बॅडमिंटनच्या छपरी कोर्टांत आले. दारांतच कमलाकर म्हणाला,

"ती कोपऱ्यांतली लठ्ठ मुलगी आहे ना—अमला–ती धारवाडला आमच्या कॉलेजमध्यें होती, तेव्हां माझ्या मागं लागली होती. जवळ जवळ प्रेमच करीत होती म्हणा ना ! हॉटेल अन् सिनेमापायी फार पैसे गेले माझे तिच्यामुळं. मी सर्व चैनी बंद केल्यावर ती रुसली. म्हणाली, 'आतां नाहीं प्रेम तुझ्यावर !'

कोर्टवरील खेळ पाहत तिघेही दूर उभे राहिले. कमलाकरानें लेमनस्क्वॅश मागवलें व नव्या मुली कोणकोण आल्या आहेत ह्याची चवकशी करूं लागला. कॉलेजब्यूटी कोण, किती जणींनीं नवीं प्रेमें सुरू केलीं, किती– तेवढयांत त्याला एक मुलगी दिसली. त्याची बडबड थांबली व चेहरा फुलला. जराशानें आपल्या मित्रांना तो म्हणाला, "ती पहा माझी प्रेयसी !– ती–तिकडची–दोन वेण्या घातलेली. माझ्या खेळावर फिदा आहे. अगदीं हातांत आली आहे माझ्या ! नुसते फॅशनेबल कपडे घालून न् पैशानं भरलेलें पाकिट बाळगून हिंडायचं, त्यांतच जरा नाजुक हावभाव व थोडीशी लाचारी केली कीं जमतं सारं प्रेम !!"

मैत्रिणींच्या घोळक्यांतून जाणाऱ्या त्या मुलीला कमलाकरानें हांक मारली, "कुसुम, ए कुसुम—"

क्षणार्धात एक मुलगी पुढें आली. गोरी अन् चुणचुणीत ! कृत्रिम सौंदर्यानें चेहरा भरलेला होता. डोळ्यांतले लाडके भाव सारे खोटे वाटत होते.

कमलाकरनें टक लावून तिला न्याहाळून घेतलें. अन् मग तिच्याशीं तो काव्यमय कुजबुज करूं लागला.

आजूबाजूचे प्रोफेसरांचे टांगलेले फोटो पाहत तात्या वेळ काढीत होता. त्याच्या मनात अनेक वेडे वांकडे विचार अर्धवट येऊन जात होते. समोरचें सिनेमामय वातावरण अविचारी अन् अनैसर्गिक आहेसें वाटत होतें. प्रेम कसें नि कुठें बसते हें त्याला समजलें होते. ह्यांचे संबंध किती स्वच्छ असतील व संसार किती सुखाचे होतील ह्याची कल्पना त्याला येत होती.

रंगनाथला ती आचरट न् पांचट दृश्यें पाहण्याची इच्छाही उरली नव्हती. नाइलाजाने तो त्या कृत्रिम व पुस्तकी वातावरणांत बसला होता. हे संभावित

व दांभिक वातावरण पाहून त्याच्या कल्पनांचें पाणीच पाणी झालें होतें. चांगल्या घरांतल्या मुलींना भूल पाडायचे हे सुधारकी डाव–आपल्या बहिणीची ही विटंबना पाहून त्याची दृष्टि जड झाली होती.

कमलाकर एका कोपऱ्यांत जाऊन आपल्या योजलेल्या प्रियतमेशीं गूढगुंजन करीत होता.

× × ×

दुसऱ्या दिवशीं सारा वेळ पाऊस पडला. तिघांनाही त्या छोट्या खोलींत राहणे नकोसे झालें.

तात्या कंटाळून खिडकीपाशीं बराच वेळ उभा होता. दुसऱ्या दोघांच्या वर्तनाची त्याला चीड आली होती. एक स्वतःला फसवून अन् दुसरा लोकांना फसवून स्त्रीजातीची अवहेलना करतो ह्याचा त्याला विषाद वाटला. खिडकींतून बाहेर पाहताना समोरच्या स्वयंपाकघरातली स्त्री दिसली, तेव्हा तात्या इतर सर्व विचार विसरला. त्या सुवासिनीकडे, त्या सुगृहिणीकडे पाहतांना तात्याला प्रसन्न वाटूं लागलें.

कमलाकर खुर्चीत पहुडला होता. खोलींतल्या दोन्ही सोबत्यांची त्याला किळस वाटत होती. स्त्रियांची किंमत करण्यांत दोन्होही साऱखेच राक्षसी होते, ह्याचा त्याला विषाद वाटला. परवांची अपुरी राहिलेली प्रेमकथा त्यानें वाचायला घेतली. त्यातलीं समानतेचीं अन् सहजीवनाचीं वर्णनें वाचतांच तो सारें भान विसरला.

रंगनाथ पलंगावर आडवा झाला. रूढीच्या नांवाखालीं वधूपरीक्षा करणाऱ्या व समानतेच्या नांवाखालीं प्रेमाचीं जाळीं पसरणाऱ्या दोन्ही भयंकर शिकारी सोबत्याना त्यानें एक इरसाल शिवी दिली; व डोळे मिटून क्षणांतच तो स्वप्नसृष्टींत विहार करूं लागला.

## गुलाबी कोडें

८

बोमनजी आणि बोमनजी. बार आणि बिलियर्डस्. बिलियर्डस् नुसतें नांवाला. टेबलाचा उपयोग दिवसा सोडयाच्या बाटल्या अन् रात्रीं नोकराला निजायला होई. दारूबंदी अन् बोमनजी कुटुंबांतलीं भांडणें ह्यांनीं बारचेंही गिऱ्हाइक घटलें होतें. त्या एका बाजूच्या गलिच्छ जागीं येणार तरी कोण?—शेजारच्या मोटर कारखान्यांतले कामगार, पलीकडच्या स्टुडिओंतले खप्पड सिनेमा नट, मागच्या बाजूच्या ख्रिश्चन कॉलनींतले लोक अन् मग चुकून माकून आलेलें तुरळक गिऱ्हाईक—

सार्जंट जिरोमला वाटलें, आपण उगाचच इथें आलों. साऱ्या आयुष्यांत कॉर्नेल युनिव्हर्सिटींतल्या किंवा वॉशिंग्टनच्या वैभवशाली पानगृहाखेरीज तो दुसरीकडे गेला नव्हता. त्याच्या गांवचा किंवा बोटीवरचा बार देखील टुमदार होता. अन् आतां ह्या गांवठी गुत्त्यांत कसें बसायचें?–जेरोमचें मन चुळबुळलें. पण घशाला कोरड पडली होती, पाय थकले होते, अन् मन अगदीं निराळ्याच स्थितींत होतें. कैरोचा बार काय मोठा नामांकित होता?–अन् पिरॅमिडच्या पायथ्याशीं दूर इतर टूपर्सबरोबर पिऊन तेथेंच लोळलों

नव्हतो कां ?–सार्जंट जिरोमनें ओंठावरून जीभ फिरवली अन् तो कोपऱ्यांतल्या खुर्चीवर बसला.

आणि ही दारू भलतीच वेगवान् होती. मेक्सिकन् रम्, आफ्रिकन ब्रँडी, आस्ट्रेलियन बीर इतकी चढत नाहीं. पण नासिक व्हिस्कीची गतीच और. जेरोमला जीपमधून धांवत गेल्यासारखें वाटलें. त्याचें डोकें जड होऊं लागलें. जसे कांहीं भरभक्कम बूटच वर ठेवले आहेत. पाय हेलमेट अडकल्यासारखे फिरूं लागले. आपण कुठें आहोंत त्याला उमजेना. परेडचे हुकूम त्याच्या कानांवर आदळूं लागले. मार्च करीत तो पॅराशूटसह उडाला. पुन्हां पडला तो त्याच्या गावी फेस्टसला. समोर त्याचें घर होतें. त्याची माणसें होतीं. मागें मिसोरी नदीचें विस्तृत खोरें पसरलेलें ! छे, तो एकदम खळबळून भानावर आला. सर्वस्वाचा त्याग करून, त्रागा करून, कंटाळून तो सैन्यांत आला होता. सातासमुद्रापार आला होता. आणि आतां हिंदुस्थानांतल्या एका गुत्त्यांत बसला होता—

जेरोम स्वतःशींच हंसला. इतक्या लवकर आपण तोल घालवूं लागलों हें पाहून त्याला हंसूं आलें. अन् आपण स्वतःशींच हंसत आहोंत ह्याची त्याला एकदम शरम वाटली. तो स्तब्ध राहिला. पण तशा अवस्थेंत त्याला राहवेना. तोंडांत जळती सिग्रेट, टेबलावर रिकामा ग्लास आणि आजूबाजूला सुंद वातावरण. जेरोमचें मन भरून आलें. कुणाशीं तरी बोलावें, खूपखूप बोलावें, मन मोकळें करून बोलावें असें त्याला वाटलें. त्यानें आजूबाजूला पाहिलें. समोरच्या टेबलावरचा माणूस देखील आतां उठून गेला. साऱ्या गुत्त्यांत तो आणि कॅशरचें न् वेटरचे दुहेरी काम करणारा काळाकुट्ट नोकर. बाकी कुणी नाहीं. जगांतली इतर माणसें अदृश्य झालीं होतीं जणूं. आयुष्यांत आजपर्यंत भेटलेले असंख्य लोक त्याला मुळींच आठवेनात. अहोरात्र बरोबर असणारे सैन्यांतले संवगडी त्याला स्मरेनात. भावनातीत होऊन त्याने नोकराला हांक मारली.

नोकर अदबीनें आला. सैन्यांतलीं गिऱ्हाइकें त्याला प्यार होतीं. बेफिकीर असतात. बेहोष असतात. सढळ असतात. त्यांतून हें गिऱ्हाईक अमेरिकन. अमेरिकन गिऱ्हाईक म्हणजे–देवीला वाहिलेले गब्लेलठ्ठ बकरे जणूं !—

जेरोमनें विचारलें,

" नांव काय रे तुझं ?—"

" हरिश्चन्द्र डिसूझा—"

जेरोमनें तोंड वेडेंवांकडें केलें. डोकें खाजवलें. अन् मग सोड्याची बाटली फुटल्यागत हास्य करून तो ओरडला,

" हॅरी ?—हात मिलाव—"

हरिश्चन्द्र डिसूझानें निरखून पाहिलें. रंगरूट रंगेल होता. त्यानें हात पुढें केला. जेरोमनें तो काळ्या रंगाचा पंजा घट्ट पकडला नि म्हटलें,

" तूं दोस्त झाला आहेस माझा—दोन पेग घेऊन ये--अन् दोन ग्लासही. आज मी पाजणार आहें तुला—"

हरिश्चन्द्र डिसूझा चमकला. एकादा माणूस त्याला कधीं दारू देत असे. पण हा मिसोरीचा मारवाडी वेगळा वाटला त्याला. तो बावरून म्हणाला,

" नको शेट—"

" नको काय ?—घे ना–मला परका कां मानतोस ?—"

" तसं नव्हे. पण गिऱ्हाइकाजवळ टेबलाशीं बसून पिणं गैर नाहीं कां ?—दुकानांत इतर नोकरही नाहीं. मालकही बाहेर गेले आहेत. बोमनजी शेट आले तर—"

" तो मगाचाच पारसी ना ?—अरे–ती तर उमर खय्यामची अवलाद—"

आपल्या माहितीवर व बोलण्यावर आपणच खूष होऊन जेरोम जोरानें हंसूं लागला. त्यानें जबरदस्तीनें हरिश्चंद्राला बसवलें अन् दोघांच्या पिण्यास प्रारंभ झाला.

कांहीं काळ शांत गेला. फक्त टेबलावरचे पेले ओठाशीं जात होते. पिण्याचें प्रमाण वाढलें अन् नशेचा अंमल सुरू झाला.

हरिश्चंद्र एकदम लाचारीनें म्हणाला,

" मी तुमचा आहें–बंदा गुलाम आहें—"

जिरोम आश्चर्यानें आणि आवर्जून म्हणाला,

" आभार कसले ?–आपण दोस्त म्हणून पीत आहोंत. आपल्यांत तसं दूरत्व कुठाय् ! फरक कुठाय्—? "

" फरक ! ?–" हरिश्चंद्र तारवटलेले डोळे मोठाले करीत म्हणाला.

थोडा वेळ गेला नि मग हरिश्चंद्र म्हणाला,

" गोऱ्या दोस्ता !—तुझी न् माझी बरोबरी का आहे ? तूं गोरा; त्यांतून अमेरिकन गोरा; त्यांतून मिलिटरींतला अमेरिकन गोरा—अन् मी ? ?–मी काळा हिंदी, बाटगा, महार......"

बोलतां बोलतां हरिश्चन्द्राचे शब्द विरघळूं लागले. डोळे मिटले गेले अन् त्यांतून पाणी घळघळ घसरलें.

जेरोम थक्क होऊन पाहूं लागला. बावरला. हरिश्चन्द्राची लाचारी न् दीनमुद्रा दूर कशी करावी त्याला उमजेना. त्याचेही डोळे भरून आले. आणि ते लपविण्यासाठीं त्यानें भरलेला प्याला ओठाला लावला.

हरिश्चन्द्र म्हणाला,

" आयुष्यांत पहिल्यानें इतक्या प्रतिष्ठितपणं मी पीत आहें. सारं आयुष्य अपमान अन् उपहासानं भरलं आहे. सरपटणाऱ्या किड्याप्रमाणं—"

जेरोम पुढें सरकला. टेबलाच्या टोंकाला कोंपरे टेकून त्यानें विचारलें,

"...पण कां ?–दारिद्र्यामुळं का ?–"

" सर्वच गोष्टीमुळं !—कनक, कीर्ति अन् कांताही–दारिद्र्यामुळं तर सर्वांत अगोदर—"

थोड्या वेळानें हरिश्चंद्र सांगूं लागला,

"—पिढ्यान् पिढ्या गरिबी आमची. आम्ही त्रावणकोरचे महार. हिंदुस्थानांत सर्वांत गरीब प्रांत तो. त्यांतून आम्ही महार म्हणजे नासक्या अन्नाचे धनी. त्यांतून ब्राह्मणांनीं महारकी आरंभल्यानं आमची अगदींच कुचंबणा होऊं लागली. धंदा चालेना अन् पोटासाठीं परागंदा व्हायची पाळी आली.

" दारिद्र्याबरोबर इतर असंख्य गोष्टी घरांत ठाण देऊन होत्या. रोगराई,

चोऱ्या करायची वृत्ति अन् ढिली नीति. सर्वांत वाईट म्हणजे लाचारी. त्यापायीं वडिलांनीं धर्म सोडला नि ते ख्रिश्चन झाले—"

" पण ख्रिश्चन झालं कीं पैसा कसा मिळेल ?--"

हरिश्चंद्र हंसला. अन् तें पाहून जेरोम जरा विरमला.

हरिश्चंद्र म्हणाला,

" तें तुला समजायचं नाहीं. परतंत्र राष्ट्रांत ही नुसतीच अफूची गोळी नसते–ती विषाची गोळी असते–पण तें जाऊं दे ! सांगायचा मुद्दा म्हणजे ख्रिश्चन होऊनही आमची स्थिति सुधारली नाहीं. स्वतंत्र धंदा सोडून आम्ही बबर्जींची नौकरवालीं माणसं मात्र बनलों. लाचारी वाढली....अन् त्या पायीं...जाऊं दे...दारिद्र्यासारखा शाप नाहीं दुसरा. तेंच मी श्रीमंत असतों तर ?--"

" तर ?–तर काय केलं असतंस ?—"

हरिश्चन्द्र जरा गोंधळला. जेरोम तेवढ्यांत सरसावून म्हणाला,

" श्रीमंती ही सापेक्ष असते. श्रीमंत असतास तर काय फरक झाला असता ? जीं पापं अगतिक होऊन अन् दग्ध मनानं केलींस, तींच पापं पुण्य समजून फुशारकीनं केलीं असतींस......माझंच बघ ना !—तुम्हा हिंदी लोकांच्या मानानं मीं नबाबासारखा श्रीमंत आहें. अगदीं गर्भश्रीमंत !– माझ्या वडिलांचा वाशिंग्टनमध्यें एक मोठा छापखाना होता. ते एक मोठं वर्तमानपत्र चालवीत असत. माझी आई मिसोरीची जमीनदार होती. माझे काका तर ' पा ' संस्थानचे गव्हर्नर होते...."

हरिश्चंद्रानें चमकून ग्लास खालीं ठेवला आणि तो थक्क होऊन उभा राहिला. केवढ्या धनाढ्य माणसाशीं तो बोलत होता !—ज्याच्याकडे हरिश्चंद्र पूर्वी नोकरीला होता–तो साहेब फक्त एक जिल्हाधिकारी होता. अन् हा जिरोम तर...

जेरोमनें त्याच्या हाताला धरून खालीं बसवलें अन् तो म्हणाला, " माझी श्रीमंती सांगून तुला घाबरवीत नाहीं मी. मला इतकंच म्हणायचं आहे कीं एवढा पैसा पायाशीं लोळत असून मीं काय केलं ? अजीर्ण होऊन आजारी पडलों अन् गंमत म्हणून लबाड्याही केल्या. पैसा असून कांहीं

नसतं रे. अगदीं नोटांच्या सिग्रेटी करून ओढल्या मीं. पण मायेच्या माणसांची ऊब मला कधींच मिळाली नाहीं—"

हरिश्चन्द्र आश्चर्यानें ऐकत होता. सारें त्याला नवीन होतें अन् थक्क करून सोडणारें होतें. त्यानें जेरोम थांबलासें पाहून म्हटलें,

"मायेची ऊब म्हणजे काय ? बायकोचं प्रेम का ?—"

"छत्. स्त्रीच्या प्रेमावर माझा विश्वास नाहीं. त्यापेक्षां उच्च प्रेम मी आईबापांचं मानतों."

"नातलगांचं प्रेम ?"–हरिश्चंद्र सोडयाची बाटली फोडीत ओरडला, "हे दोन शब्दच जवळ येत नाहींत."

जेरोम सिग्रेट पेटवीत म्हणाला,

"मला नाहीं वाटत. माझा काका, आई, बाप अन् बहीण जिवंत असतीं तर...त्यांनीं ठेवलेल्या नुसत्या पैशाला घेऊन काय चाटायचं आहे—"

"नातलग जिवंत असते तर चाटत बसला असतास होय ? अरे–नातलग म्हणजे गिधाडं असतात, गिधाडं !–पैसा असतो, सुस्थिति असते, तोंवर घोळ घालतात. मी शिकत होतों तेव्हां, पुढं पैसा मिळेल म्हणून माझा बाप इतर मुलांपेक्षां माझे अधिक लाड करी. बाप मेल्यावर आईनें बिनदिक्कत एका पैसेवाल्या गोवेकऱ्याशीं लग्न केलं. आमची काळजीही केली नाहीं. मोठ्या भावानं श्रीमंत मुलीशीं लग्न केलं अन् त्याला मला ओळख द्यायचीही लाज वाटते. त्याच्या नादाला लागून बहीणही...पैशाच्या झंकारावर नातलग नाचत असतात रे !–तुझीं माणसं असतीं तर त्यांनीं तुझं कोडकौतुक केलं असतं, माया दाखवली असती, पण ती बेगडी–बँकेची !–तूं संकटांत सांपडला असतास तर...सुखी आहेस बेट्या एकटा आहेस तो—"

इतकें बोलून हरिश्चंद्र मागें रेलला.

जेरोमही खुर्चीत सुस्तावला होता.

टेबलावर ग्लसांची गर्दी उडाली होती. चणे इतस्ततः उधळले होते. बाजूला बाटल्या वांकड्या तिकड्या पडल्या होत्या अन् टेबलाखालीं मांजर बसलें होतें. बारमध्यें आणीक कुणी नव्हतें. बाहेर काळोख पसरला होता.

काळोखाकडे पाहत हरिश्चंद्र म्हणाला,

" माया ?–नातलगांना निराळं आयुष्य जगायचं असतं म्हणून ते स्वार्थी असतील. पण एकाद्या स्त्रीचं निष्पाप, निर्व्याज, प्रेम—"

जेरोम सिग्रेट विझवीत म्हणाला,

" स्त्रीचं प्रेम ?–"

हरिश्चंद्राला बोलवत नव्हतें. तशांत ह्या नव्या विषयाची अनेक मृगजळें त्याच्यापुढें नाचत होतीं. तो कसाबसा म्हणाला,

" माझी नुसती कल्पना आहे. प्रेयसीचं प्रेमच चिरंजीवी असतं. त्यांत सर्व माया न् सर्व संपत्ति सांठवली आहे—"

" सर्व गटारं सांठवलीं आहेत—"

जेरोम खांकरत मोठयानें म्हणाला. हरिश्चन्द्र विरमला न् म्हणाला,

" मला अनुभव नाहीं स्त्री-प्रेमाचा !–माझी वृत्ति नि परिस्थितीच त्याला प्रतिकूल होती. तशांत मी एकीवर प्रेम केलं. पण तें एकांगी. माझी तिची ओळखही झाली नाहीं कधीं. स्त्री हें मला अजून गूढ आहे, परंतु—"

जेरोमचे डोळे तारवटले होते. मान लाल पडली होती. कुठं तरी पाहत तो म्हणाला,

" मी प्रेमाचा प्रचंड अनुभव घेतला आहे. एका मुलीवर भाळून तिच्यासाठीं सर्वस्व सोडायला सिद्ध झालों. तिनं मला खूप झुलवलं, चाळे केले, आशा दाखवली, वचनं दिलीं. अन् एक दिवस दुसऱ्या तरुणाचा हात धरून ती चालती झाली. जास्त सुख, ताबडतोब मिळणारं सुख, हें स्त्रीचं ध्येय असतं. तें सुख न् स्वातंत्र्य दिसल्यावर त्या झेप टाकतात–परोपरीच्या प्रीतीची पर्वाही करीत नाहींत. त्यांचं मन क्षुद्र असतं–विचार स्वार्थी असतात—"

जेरोम बराच वेळ बोलत राहिला असता. हृदयाच्या तळांतून उसळी मारून तें दुःख स्रवूं लागलें होतें. पण तो एकाएकीं मूक झाला. एक हात छातीवर ठेवून तो कांहीं मिनिटांनीं म्हणाला,

" प्रेमभंगाच्या झळा तुला ठाऊक नाहींत हें तुझं केवढं भाग्य !–मीं तो मूर्खपणा केला. ती पोर देखील बेशरपणें मला मूर्ख म्हणते. स्त्रीजात

केवढी...! अन् स्त्रीजीवनाची इतर रूपंही मीं पाहिलीं आहेत. संपत्तीसाठीं, प्रसिद्धीसाठीं, किरकोळ सुखासाठीं, चाकोलेटच्या तुकड्यासाठीं, स्त्री वाटेल तें करील. हें पाहा—"

बोलतांबोलतां त्यानें आपले गोरे बाहू पुढें केले. त्यावर ठिकठिकाणीं हिरवींतांबडीं नांवें गोंदलीं होतीं. बॉर्बेरा, मार्गारेट, एल्सा, चार्लोटी, एडना मेरी, जोन...

त्याचे हात हातांत घेत हरिश्चंद्र पाहत राहिला. स्त्रीची विटंबना ऐकून त्याला किळस आली होती. खरंच स्त्रीजात अशी असेल ?-त्याच्यापुढें प्रेयसीचा प्रशांत चेहरा उभा राहिला. नावरून त्यानें समोर पाहिलें. जेरोम हंसत होता. त्याचें हंसणें वाढूं लागलें. वेड लागल्यासारखें तो हंसत होता. उत्तरादाखल हरिश्चंद्राला स्मित करावें लागलें. मघाशीं तो रडला तेव्हां जेरोमचे डोळे नव्हते का भरून आले ?—

पण हरिश्चन्द्राला हंसवेना. जास्त पिण्यानें त्याचें डोकें चढलें होतें. तशांत नवेनवे विचार डोक्यांत गरगर घुमत होते. त्याला वाटलें—मग जगायचें तरी कां ?—

जेरोम चणे उडवीत बेहोषपणें म्हणाला,

"—अरे, मी एवढ्यासाठींच जिवंत राहिलों का ?-संपत्तीनं समाजांतून उठवलं, माया मिळाली नाहीं न् प्रेयसीनं फसवलं—"

हरिश्चन्द्राला वाटलें, केवढा हा दुर्विलास ! तो पिचत पडला होता. नातेवाईकांनीं त्याला टोंचलें होतें. स्त्रीचें प्रेम त्याला कधींच मिळालें नव्हतें...अन् जेरोमची तर उलटी तऱ्हा. तोही दुःखी न् तळमळणारा. मग आयुष्याचा अर्थ तरी काय ?—

पुन्हां सर्वत्र शांत झालें.

त्या निस्तब्धतेंतही हरिश्चंद्राला एक कल्पना आली. ध्येय—उदात्त ध्येय—का काय तें म्हणतात त्यासाठीं तर...खुर्ची सरकवून तो जेरोमजवळ बसला न् त्याला हालवीत म्हणाला,

"ह्या ऐहिक लोभी कल्पना फोल आहेत असं नाहीं तुला वाटत ?—कीर्ति मिळवणं हेंच—"

" कीर्ति ?-कसली कीर्ति—" जेरोम झोंपेंतून उठल्यागत म्हणाला.

हरिश्चंद्र उद्गारला,

" उदाहरणार्थ पाहा, मला मोटरीचा नाद आहे. ड्रायव्हर बनायचं ध्येय ठेऊन—"

" मग कां नाहीं बनलास ?—"

" संधीच नाहीं मिळाली. अन् वशिलाही नव्हता—"

" संधि अन् वशिला ! वशिला न् संधि—" जेरोम पुटपुटूं लागला. मग तो मोठ्यानें स्वतःशींच उद्गारला,

" हा वशिलाच कां असावा ?—अन् संधीच कां मिळूं नये ?—"

हरिश्चंद्र नशेनें कोसळायच्या बेतात आला होता. डोकें तसेंच खालीं लोंबत ठेवून तो बरळला,

" काय जणं !—पण जगाचा हा न्याय आहे–नव्हे अन्याय आहे !—"

जेरोमनें हनुवटी वर केली. डोळ्यांत कसलीशी चमक आली. उभा राहत तो म्हणाला,

" अन्याय खराच !—सर्वांना समान जीवन जगायची सारखी संधि मिळत नाहीं. साऱ्या मानवजातीची रचनाच कृत्रिम न् विषम झाली आहे—"

हरिश्चंद्रानें त्याला खालीं ओढलें आणि झोकांच्या खात त्याच्या कानांत म्हटलें,

"—अगदीं हेंच मला वाटतंय् !—गुलामगिरीनं, दुःखानं, माझी तळमळ वाढली आहे—तुला सारं विनासायास लाभलं म्हणून बावचळून तुझं हें मत बनलं. पण आपण दोघे एकाच व्यथेनें पोळलों आहोंत. माझा हात धर–माझ्या दोस्ता—"

हरिश्चंद्रानें त्याच्या छातीवर डोकें ठेवलें. त्याच्या डोक्यांतील विचारांच्या सुरांचे पडसाद जेरोमच्या हृदयात स्पष्ट घुमत होते जणूं !—जेरोमच्या वैफल्याचें नि हरिश्चंद्राच्या दैन्यावस्थेचें मूळ एकच होतें !—जगाच्या एका टोंकाला असलेल्या माणसाच्या मनांतल्या खळबळीचे पडसाद दुसऱ्या

खंडांतल्या भिन्न स्थितींतल्या माणसाच्या मनीं घुमावेत हें केवढें विलक्षण कोडें !—

डोळे मिटत जेरोम म्हणाला,

" दोस्ता ! रागावूं नकोस. ह्या विषमतेचा वांटेकरी मी होतों. पण आतां मी झगडेन ! अमेरिकेचा द्वेष करूं नकोस. तुझीं दुःखं मोठीं आहेत–तूं मोठा आहेस–तूं पंडित नेहरू आहेस—"

" काळया लोकांसाठीं झगडणारा तूं पॉल रॉबसन् आहेस. काळया पॉल !–जरा एखादं क्रांतिगीत गा रे ! "

" गातों—" असें म्हणून जेरोमनें त्याच्या खांद्यावर मान टाकली आणि तो झोंपीं गेला.

# सुरामारी

## ९

सुखलालजी स्ट्रीटच्या एका गल्लींतून कसलासा आरडाओरडा एकाएकीं ऐकूं आला. गल्लीच्या नाक्यावरील दुकानाच्या दाराशीं उभ्या असलेल्या एका इसमानें ती गडबड ऐकतांच भीतीनें धांवायला सुरुवात केली. पंधरा-वीस पावलें तो धापा टाकीत धांवला तोंच त्याला रस्त्याच्या दुसऱ्या किनाऱ्याला उभ्या असलेल्या चारपांच पिवळ्या पगड्या दिसल्या. तो इसम थांबून त्या पोलिसांना पुकारूं लागला; पण भीतीनें त्याची बोबडी वळली होती. त्याचे हातवारे पाहून पोलिसांना जर्दा देणाऱ्या पानवाल्यानें म्हटलें, “ मागल्या गल्लींत पुन्हां हाणामारी झालेली दिसते आहे ! ” चारी पोलिसांनीं आपल्या काठ्या सरसावल्या व ते लगबगीनें धांवले. रस्ता ओलांडतांना समोरच्या हॉटेलांतून चहाचा ग्लास हातांत घेऊन येणाऱ्या एका वेश्येला त्यांचा धक्का लागला. त्या वेश्येनें गोंधळून पाहिलें. तिच्या लक्षांत सारा प्रकार आला. ती बावरली. एका हातांतला चहाचा ग्लास व दुसऱ्या हातांतली नानकटाई सांवरीत जिना चढून ती आपल्या मकाणांत आली. बाहेरच्या टेबलावर सामान ठेवून ती झरदिशीं आंतल्या खोलींत आली. खोलीच्या मागल्या व्हरांड्यांत एक इसम झोंपला होता. त्याचे

पिंजारलेले केंस खसदिशी ओढीत ती उद्गारली, " ऊठ रे ! परवां रात्रीं जुगार खेळून नि बेदम पिऊन निजलास तो अजून मुडद्यासारखा पडला आहेस ! ऊठ ! कालपासून दंगा पेटला आहे गांवभर ! ऊठ, ऊठ ! एखाद्या दादानं किंवा पोलिसांनं तुला इथं पाहिलं कीं मला तकलीफ व्हायची ! "

ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळत तो इसम जड स्वरांत पुटपुटला, " हिंदुमुसलमानांचाच दंगा ना ! अंः ! मला काय ? " दुसऱ्याच क्षणीं तो ताड्कन् उठून बसला. केसांचीं झुलुपें मागें सारीत आणि तांबडेलाल डोळे रोंखीत तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, " दंगा !..."

× × ×

जयतुन नायकिणीच्या घरून तो निघाला तो प्रथम एका इराण्याच्या हॉटेलांत शिरला. गुलाबी चहाचे मोठे घुटके त्यानें आधाशासारखे घशाखालीं घातले. दोन कप चहा पोटांत गेल्यावर जरा तरतरी आल्याचा त्याला भास झाला. दीडएक दिवस आपण निजलों ह्याचा त्याला विस्मय वाटला. परवां रात्रीं आग्रीपाड्यावरच्या अड्ड्यावर हरनामसिंगशीं भांडण झाल्याचें त्याला आठवलें. त्या आठवणीसरशीं त्यानें आपल्या जबड्याची डावी बाजू समोरच्या आरशांत पाहिली. तेथली जखम आतां वाळून गेली होती....बेसावध असतांना हरनामनें तो वार केला होता अन् तेवढ्यांत तो पळून गेला होता. त्या संतापांत उरलेले डाव एकसारखे हरले गेले अन् मग चिक्कार ढोसून जयतुनच्या घरीं शरीर कसेंबसें लोटून दिलें...ती सारी घडामोड स्मरतांच त्याच्या तांबड्यालाल डोळ्यांत सूडाची हिरवट लहर सर्कन् चमकून गेली. खालचा ओठ दातांखालीं चावत त्यानें आरशांत पुन्हा पाहिलें. कित्येक दिवसांत तेलपाणी न केलेले केंस, चार दिवसांची वाढलेली दाढी, भरघोस गर्दन अन् भरदार छाती ! आपल्या छातीवर अस्वस्थपणें पंजा चोळीत तो उठला अन् बाहेर आला.

बाहेरच्या फूटपाथवर बराच वेळ नकळत तो उभा होता. असें उगाचच घटकान् घटका उभें राहायची त्याला संवय होती. नकळत त्यानें विडी शिलगावली व झुरके घेत तो मभोंवार पाहत राहिला. रस्त्यावरच्या हालचालींतली अमकीच एक गोष्ट त्याच्या मनांत ठसत होती असें मुळींच

नाहीं; अगर एखाद्या गोष्टीमुळें त्याच्या चेहऱ्यावर बदल होत होता असेंही नाहीं. एक फ्रॉक घातलेली छोटीशी सुंदर मुलगी रस्त्यानें एका केंसाळ शुभ्र कुत्र्याला ओढीत गेली, तें मोठें मनोवेधक दृश्य होतें ! एका उघड्या टॅक्सींतून एक प्रणयी युगुल भरल्या सकाळीं शृंगारचेष्टा करीत गेलें, अन् त्यानें सारीं चकित झालीं ! एके ठिकाणीं...पण साऱ्याच गोष्टींकडे तो सारख्याच तिऱ्हाईत अन् तटस्थ मुद्रेनें पाहत होता !

मागल्या गल्लींतून पुन्हां गडबड ऐकूं येऊं लागली. पोलिसची एक मोठी मोटर बाहेर आली अन् त्यामागोमाग लोकांचा घोळका जाऊं लागला. मोटर मोठ्या रस्त्याला आली अन् वेगानें निघून गेली. लोक पांगले. दंग्याची बातमी चौफेर पसरूं लागली...पाठींत सुऱ्याचा वार लागला...नव्या प्रकारचं हत्यार होतं...ह्या गल्लींत तिसरा खून हा... कान टोंचले होते, हिंदूच असावा...शेजारचा कोळसेवाला होता नक्की... तर्कवितर्क, अंदाज, बातम्या ह्याच्या चौफेर ठिणग्या उडत होत्या. हळूहळू त्याही विझल्या. भेदरत्या नजरेनें लोकांच्या हालचाली पूर्ववत् सुरू झाल्या.

विडी फुंकत ही सारी गंमत तो पाहत होता. मधूनमधून त्याचा हात कमरेपाशीं लपवलेल्या छोट्या चाकूकडे जाई. मध्येंच कुणाचासा चेहरा त्याच्यापुढें दिसूं लागे. अन् मग जिकडेतिकडे. लालचुटुक रक्ताचे ऊष्ण ओहोळ त्याला दिसत !—

उन्हाच्या तिरीपी तोंडावर येऊं लागल्यावर तो तेथून हालला. कुठें जायचें, काय करायचें, तें ठरलें नव्हतें, ठरविण्यासारखें नव्हतें. गोलपिठा, पिलाहौस, डंकन रोड, फॉकलंड रोड, ग्रँट रोड...पिसाटाप्रमाणें तो भटकत होता. लहर लागेल तर कुठें तरी पान खावें, विडी प्यावी. कुणी दोस्त भेटला तर सलाम करावा अगर गप्पा छाटाव्या ! नेहमीचा हा कार्यक्रम ! बँकेपासच्या पहाऱ्यावरील दाऊदखाँच्या खाटेवर बसून थोडा वेळ हुक्का ओढायचा; ग्रँट रोड पुलाच्या मागील बाजूस दुय्यातिय्या करीत दोनचार आण्यांच्या किस्मतीला कौल लावायचा; रामभरोसेच्या दुकानावर रसगुल्ल्याची प्लेट फुकटांत चापायची; नेहमीचा कार्यक्रम ! कित्येक दिवस, वर्षानुवर्षें...कदाचित् पिढ्यान् पिढ्या !

बागेंतल्या मनोऱ्यावरील घडयाळांत बारा वाजलेले पाहतांच त्याला भटकण्याचा कंटाळा आला. दोन दिवसांच्या विश्रांतीनंतर एकदम खूप भटकल्यामुळें पाय दमले होते. ऊनही आतां माजलें होतें. कपडे मळलेले, दाढी वाढलेली अन् सारें अंग अवघडून गेल्यागत झालेलें. त्याला वाटलें, एखाद्या सलूनमध्यें जाऊन दाढी करावी, गार पाण्याच्या बादल्या भरभरून अंगावर ओताव्या अन् स्वच्छ कपडे घालून वाफा सुटलेलें स्वादिष्ट अन्न खावें! पण हा विचार आला तसाच तात्काळ विरला! खमिसाच्या खिशांतील उरलेली चवली चांचपीत तो भायखळयाच्या रसोईंत आला. नेहमीप्रमाणें एक मोठा परोठा अन् त्याबरोबर मोफत मिळालेली लोकीची भाजी घेऊन त्यानें खायला सुरुवात केली.

शेजारच्या दुकानांतल्या रेडिओवर प्यारुकव्वालचीं मस्त कवनें चालू झालीं म्हणून तो खाणें संपलें तरी तसाच बसला. दिलफोडक स्टंटपटांच्या इतकेंच गझ्झल कवाल्यांचें त्याला वेड होतें. गाणीं संपलीं कीं उठायचें, पान खाऊन राणीच्या बागेंत कुठें तरी आडोशाला आराम करायचा, अंधार पडला कीं कुणाला तरी गांठून कसलें तरी काम मिळवायचें—चिल्लर चोरीपासून तों बिनबोभाट सुरामारीपर्यंत कांहींही! मग कवड्या, बाटल्या अगर बाया ह्यांच्या संगतींत...! नेहमीचा कार्यक्रम!

रेडिओ बंद झाल्यावर तो उठूं लागला. तेवढ्यांत त्याच्या शेजारीं डोंगरीचा एक प्रसिद्ध दादा येऊन बसला नि त्याला म्हणाला, "क्यों रझ्झाक! कांहीं खाणार का?"

रझ्झाकला बसावें लागलें. तो म्हणाला, "नाहीं. आत्तांच झालं खाणं."

"म्हणून काय झालं! आमच्याबरोबर पुन्हां थोडंसं." विचकट हंसत त्या दादानें दुकानदाराला ऑर्डर दिली.

अन् थोडया वेळांत पांचसहा परोठे, दहाबारा शामे कबाब अन् ढीगभर लोकीची भाजी दोघांच्या पुढयांत येऊन पडली.

बराच वेळ कांहीं बात न करतां दोघेजण खात होते. एक वाजायला आला होता म्हणून आजूबाजूला बरीचशी शांतता पसरली होती. भायखळ्याचा बाजार बराचसा आवरला होता. तिथले मजूर नि कामकरी काम

संपवून आपापल्या मकाणांकडे जात होते. आजूबाजूला मोठमोठ्या इमारतींत सुखवस्तू व श्रीमंत कुटुंबें दुपारचा आराम करीत होतीं. मुल्लाजीच्या त्या भटारखान्यांत हे दोघे गुंड पुढ्यांतल्या पदार्थांचा फडशा उडविण्यांत गर्क झाले होते.

खाणें आटोपल्यावर डोंगरीचा दादा म्हणाला, "जरा पलीकडे चल माझ्याबरोबर ! काम आहे..."

रझाकचे डोळे आनंदानें चमकले. काम ! नकळत त्याचा हात कमरेपासच्या चाकूकडे गेला. कांहीं तरी काम हवेंच होते ! नाहीं तर उद्यां खायचें काय ?

एका आडोशाला आल्यावर दादा म्हणाला, "हल्लीं काय चालू आहे ?"

"कांहीं नाहीं ! खेतवाडींत एका रांडेकडे शेट्याला लुटला परवां ! त्याच्यानंतर कांहीं काम नाहीं मिळालं. तशांत परवां जुगारांत..."

दादानें रझाकचें जाकीट धरून म्हटलें, "हिंदु-मुसलमानांचा दंगा चालू आहे, विसरलास वाटतं ?"

रझाक म्हणाला, "हो, कळलंय् मला ! पण...कांहीं फायदा...?"

दादानें रझाकचें जाकीट सोडून दिलें व तो म्हणाला, "आलं लक्षांत!"

थोडा वेळ कुणी कांहीं बोललें नाहीं. मग खिशांतून गांजाचा पाला बाहेर काढीत दादा म्हणाला, "मग ?..."

रझाक दूरवर पाहत म्हणाला, "ह्या कर्फ्यूमुळं कटकट होते ! ठराविक मोर्चावरती शिकार आणतां येत नाहीं. तशांत हल्लीं भाव काय चालला आहे त्यावर...?"

"भाव चांगला आहे सध्यां ! जितक्या जोरांत दंगा भडकेल तितका हवा आहे. तें राजकारण का काय म्हणतात त्यामधी वांधा आला आहे... तुला तें समजायचें नाहीं ! नि मला तरी कुठं कळतंय् ? पण आपल्याला काय ?..."

"चल !" रझाक एकदम म्हणाला नि उठला. त्याच्या डोळ्यांपुढें हरनामसिंगचा चेहरा एकाएकीं उभा राहिला. जुगारांतले उलटें दान पडलेलें

दिसलें. भकास खिशांचें फाटकें जाकीट घालून दिवस दिवस उपाशीं काढले तें आठवलें. दंग्याच्या निमित्तानें थोडासा रोजगार करावासें एकदम वाटलें अन् तो उठला.

दोघेही मुकाट्यानें हमरस्त्याला आले. मुकाट्यानें एका ट्रॅममध्यें शिरले. आजूबाजूला खूप गर्दी होती. अनेक प्रवृत्तींचीं नि धर्मांचीं माणसें दाटीनें बसलीं होतीं. त्यांतच ह्या दोघांनीं सामावून घेतलें. बरेच लांब गेल्यावर दोघे उतरले. चारपांच आडव्यातिडव्या गल्ल्या ओलांडून एका इमारतींत ते शिरले.

चवथ्या मजल्यावर एका अंधेऱ्या खोलींत कसलें तरी ऑफिस होतें, तेथें दोघेही आले. आपल्याला कुठे अन् कां जायचें आहे ह्याची रझाकला पूर्ण कल्पना होती. तो एखाद्या सरावलेल्यासारखा आंत आला अन् खुर्चीवर बसला.

कुठल्याही संस्थेच्या कचेरींत असाव्यात त्याहून अनेक वेगळ्या गोष्टी त्या खोलींत होत्या. गणवेष घातलेल्या तरुणांची मधूनमधून ये-जा चालू होती. टेबलापाशीं बसलेला सूटबूटवाला प्रमुख, कर्कश आवाजांत अन् नाटकी आविर्भावांत त्यांना सूचना देत होता. कोंपऱ्यांत कागदाचे बरेचसे गठ्ठे पडलेले होते; अन् भिंतींवर सर्वत्र घोषणा रंगवलेल्या होत्या.

काहीं वर्षांपूर्वी थोडेसे पैसे घेऊन ह्या घोषणा ओरडायचें काम आपण केलें होतें हें रझाकला स्मरलें. ह्या घोषणा, ही कचेरी...हें आपल्या-सारख्यांचें आश्रयस्थान आहे असें त्याला वाटलें.

खोलींतलीं इतर माणसें गेल्यावर प्रमुख म्हणाला, "क्यों याकूब ! काय खबर आहे ?"

"सब ठीक है साब ! नागपाड्यावर ठरल्याप्रमाणं पुरा घबराट उडवून दिला आहे. हा...हा माझा दोस्त...रझाक ! ह्याला काम द्या."

प्रमुखानें रझाकला न्याहाळून घेतलें अन् म्हटलें, "हं ! काय उद्योग करतोस रे तूं ?"

रझाकला तो प्रश्न वेडयासारखा वाटला. उद्योग करायला तो कुणी मजूर होता कीं एखादा ऑफिसर होता ? मिळेल तें काम करायचें अन् चाहेल

तें अन्न खायचें असें आयुष्य जगणाऱ्या माणसाला कसला आलाय् उद्योग ? तो म्हणाला, " खास कांहीं नाहीं ! पण माणसं मारूं शकतों ! "

प्रमुखानें मोठ्यानें विकट हास्य केलें. थोड्या वेळानें तो म्हणाला, " माणसांना नाहीं मारायचं आम्हांला ! काफरांना मारायचं आहे ! "

रझाकला त्याचें बोलणें गमतीचें वाटलें. हे लोक नेहमीच असें तऱ्हेवाईक नि गमतीचें बोलतात हें त्याला ठाऊक होतें. तो म्हणाला, " ठाऊक आहे मला ! मागच्या दंग्यांत मीं काम केलं आहे थोडंसं."

" छान ! मग कुणाला मारशील ? आज एक तरी बळी हवा आहे."

रझाक वेगानें म्हणाला, " हरनामला ! सुखलालजी स्ट्रीटवरचा फिटर ! साल्यानं..."

प्रमुख तितक्या घाईनें म्हणाला, " छे छे ! मी सांगतों त्याचाच खून झाला पाहिजे."

रझाकला त्याच्या आग्रहाचें आश्चर्य वाटलें ! हरनामला मारणें सोपें होतें. आज तो नक्की...अन् तोही काफिरच होता. मग अमक्याला मारावें असा प्रमुखाचा कां आग्रह ? ह्या लोकांचें वागणेंही मोठें विस्मयकारक असतें !

एका कागदावर नकाशा काढीत प्रमुख म्हणाला, " ह्या कापडवाल्याला आज उडवला पाहिजेस. आमच्याविरुद्ध फार पैसा सोडतो आहे साला ! हें बघ...दादरला जायचं, तिथं..."

× × ×

दादरच्या सावजाची माहिती नीट ध्यानात ठेवून रझाक बाहेर पडला. प्रमुखाच्या सूचना, भिंतीवरच्या घोषणा अन् कामाबद्दल मिळालेल्या नोटा ह्यांमुळें त्याचें मन मोठें उत्तेजित झालें होतें. त्याला क्षणमात्र वाटलें, कीं असेंच आग्रीपाड्याला जावें अन् हरनामला सफा करावा. एकदां त्याला वाटलें, स्वच्छ दाढी नि आंघोळ करावी नि मग कामाला लागावें. पण हरनामला हरवण्याची, खुरटलेल्या श्रमजीवि इसमासारखी कल्पना अगर शरीराचे चोजले पुरवायचा श्रीमंत गृहस्थासारखा आळसी विचार त्याच्या मनांत ठरला नाहीं. हातीं घेतलेलें काम पुरें करायचें हें त्याच्या सरळ

मनाला ठाऊक होतें. एका माणसाचा खून करायची जोखीम त्याच्यावर होती. तो दादरला जाणाऱ्या ट्रॅममध्यें बसला. आज त्या माणसाला मारलें, कीं आजच्या गरजा तरी भागतील...

खुनाच्या मोबदल्याची कशी विल्हेवाट लावायची ह्याचा रझाक विचार करूं लागला. दोन लुंग्या नि एक खमीस ताबडतोब घ्यायला हवाच! हे कपडे आतां फाटत चालले अन् त्यांना वासही मारूं लागला आहे. किरकोळ खरेदी आहेच. एक टॉर्च, एक कानकोरणें, घड्याळाची दुरुस्ती! शनिवारच्या एका घोड्याची खबर कळली होती—त्यावर पैसे लावणें जरूर होतें! खेरीज......

रझाकचा हिशेब वाढत चालला. ह्या किरकोळ गरजा अन् फालतू खर्च असा वारंवार त्रास देत! रझाकला वाटलें, एक बळी घेऊन नाहीं भागायचें! सातआठ तरी...किंवा रोज एकदोन असें महिना, दोन महिने...

रझाकला वाटलें, दंगा खूप भडकावा; अन् तो कधीं थांबूंच नये! म्हणजे पोटापाण्याचा प्रश्न सुटेल अन् आयुष्याला स्थैर्य येईल! नुसतें अंधारांत हलकेंच हत्यार चालवायचें कीं आवाज न होतां रुपये खुळखुळायला लागतील!

खिशांतला सुरा चांचपत तो ट्रॅममध्यें पाहूं लागला. माणसें मेंढरांसारखीं दाटीनें बसलीं होतीं. तो एकेकाच्या पाठी निरखून पाहूं लागला. पुढेंच बसलेल्या तरुणानें चौकटीचा कोट घातला होता. सुरा खुपसला गेला कीं ह्या चौकटी कशा उस्कटतील तें रझाकला दिसलें. त्यापलीकडचा असामी खूप लठ्ठ होता. त्याच्या पाठीवर चरबीचे नुसते थरचे थर होते. सुरा भोसकतांना किती जोर करावा लागेल ह्याचा अंदाज रझाक करूं लागला. पुढें उभा राहिलेला इसम...त्यानंतरचा...

रझाकला माणसांच्या आकृतींऐवजीं सर्वत्र पाठीच दिसूं लागल्या! त्याचें रक्त उसळूं लागलें अन् त्याच्या मुठींना बॅांबचें बळ आलें!

त्या क्षणीं त्याच्या मेंदूंत एक कल्पना चमकून गेली! असे हल्ले करण्यापेक्षां आपण दंग्याचे सूत्रधार झालों तर? आपणच पुढारी बनलों तर? मघांचा

पुढारी एके काळीं आपल्यासारखा गुंडच होता म्हणें!...रझाकचे डोळे ह्या नव्या कल्पनेनें चमकले. आपण मोठमोठीं भाषणें करीत आहोंत अन् वर्तमानपत्रांतून आपले फोटो छापून येत आहेतसें त्याला दिसूं लागलें!

तेवढ्यांत शेजारीं बसलेला इसम हातांतलें वर्तमानपत्र दाखवून म्हणाला, "देखो! सकाळपासून पांच ठार अन् बारा जखमी! ह्या गुंडांनीं हैराण केलं आहे आख्ख्या मुंबईला!"

रझाकनें त्या इसमाकडे चमकून पाहिलें. बारा जखमी झाले कीं आख्खी मुंबई हैराण कशी होते हें त्याला समजेना! दंगा नसतो तेव्हांदेखील ह्यापेक्षां अधिक खून रोज गोलपिठ्यावर पडत असतात! वर्तमानपत्र वाचून बडबड करणाऱ्या त्या सुशिक्षित इसमाकडे त्यानें तिरस्कारानें पाहिलें.

दादरला येतांच त्याच्या मनांतले विचार निमाले. थंड डोक्यानें त्यानें कामाची आंखणी करायला सुरुवात केली. कॉलनीच्या कोंपऱ्यावरील पानवाल्याकडून त्यानें चार मिनारचें एक पाकिट खरीदलें अन् कापड-वाल्याच्या घराच्या खुणा तो हेरूं लागला. गुलमोहराच्या झाडाखालीं मोची बसतो, त्याच्या अगदीं समोरचें घर. घराच्या बाजूच्या भिंतीवर 'डों-ग-रे' अशीं जाहिरातीचीं भलीमोठीं अक्षरें आहेत तेंच घर. त्याचा अगदीं शेवटचा मजला. बाहेर छोटी गच्ची आहे अन् तेथें डालडाच्या डब्यांत तुळशीचें रोपटें लावलें आहे...

त्या घरांत आज खून होणार! त्या तुळशीच्या रोपाला उद्यां पाणी मिळणार नाहीं! त्या घरांतली स्त्री विधवा होऊन आकांडतांडव करणार! आजूबाजूचीं बिऱ्हाडें, बंगले भेदरून जाणार! साऱ्या वस्तीभर, साऱ्या हिंदु समाजांत हाहाःकार उडणार! आज पांच वाजतां तळमजल्यावरील अंधेऱ्या पैखान्यांत त्या कापडवाल्याचें प्रेत पाहून सर्वत्र खळबळ उडणार...

रझाकनें त्या सुखस्वप्नाच्या भरांत साऱ्या सिग्रेटी संपवल्या. पांच वाजायला अजून बराच अवकाश होता. उरलेला वेळ घालविण्यासाठीं तो स्टेशनच्या रस्त्याला निघाला. स्टेशनजवळ राहणारा एक पेहेलवान त्याचा दोस्त होता.

पेहेलवान गुडगुडी ओढीत खोलींत बसला होता. रझाकला पाहतांच तो उद्गारला, " वाहवा ! रामशरण ! तुझी आजच याद आली होती."

त्या स्वागतानें रझाक चांगलाच दचकला. खिशांतला चाकू पोटात घुसतो काय असें त्याला वाटलें. रामशरण ह्या नांवानें आपण पेहेलवानाबरोबर हिंडतों हें अगदींच कसें विसरलें गेलें हें त्याला कळेना ! रामशरण ! हिंदु ! रझाकला सुचेनासें झालें. आपला संभ्रम लपविण्यासाठीं त्यानें गुडगुडी ओढायला सुरुवात केली.

पेहेलवान म्हणाला, " याद अशासाटीं, कीं मीं एक कंत्राट घेतलं आहे ! दंग्याचं ! तूं करतोस काम त्यांत ? पैसाही खूप सोडला आहे आमच्या पुढाऱ्यानं."

गुडगुडी ओढूनही रझाकचा संभ्रम सरला नाहीं. त्याला बेचैन वाटू लागलें. डोंगरीवरची कचेरी दिसली, तेथल्या घोषणा आठवल्या, अन् दादरचा कापडवाला आपणाकडे पाहून हंसतो आहेसें वाटूं लागले. तो कसेंबसें म्हणाला, " नाहीं...जमायचं नाहीं आपल्याला ! "

पेहेलवान पेहेलवानीं पद्धतीनें हंसला आणि म्हणाला, " तुला जमायचं नाहीं ? काय म्हणतोस काय रामशरण ? तिकडच्या वस्तींतला तूं ! तुला तें फार सोपें आहे. मागं एकदा पांच रुपयांकरिता तूं उस्मानला उडवला नव्हतास का ? आतां तर त्याच्या दसपट पैसे मिळतील..."

बोलणें संपल्यावर पेहेलवान पुन्हा खदखदूं लागला. रझाकला कांहीं सुचेनासें झालें ! पांच रुपयांकरितां आपण खून केला होता–अन् तोहि एका मुसलमानाचा ! अन् आतां ?...संभ्रमाची जागा विस्मयानें घेतली अन् मग त्याला साऱ्या गुंतागुंतीचें हंसू लोटलें.

थोडया वेळानें तो पेहेलवानाबरोबर एका ऑफिसांत गेला. ती सकाळच्या कचेरीहून वेगळी नव्हती. सर्व खाक्या तोच ! फक्त घोषणा विरुद्ध, मुद्दे उलटे, बातम्या नि बोलणीं निराळीं...बाकी सारें साम्य ! माणसांची जात वेगळी... पण वर्तन तेंच !

तेथल्या पुढाऱ्यानें रामशरणला उंच आवाजांत अन् कृत्रिम आविर्भावांत एक भलें मोठें व्याख्यान दिलें. रामशरणानें तें समजून घेण्याचे श्रम घेतले

नाहींत. विरुद्ध पक्षाचा भाव काय आहे इकडे त्याचें ध्यान होतें. पैसे मिळाल्यावर तो खूष झाला नि म्हणाला, " आपल्या म्हणण्याप्रमाणं आजच काम उरकतों ! नेमकं कुणाला मारायचं तेवढ..."

पुढाऱ्याचा चेहरा प्रसन्न झाला. फार दिवसांची मनांतली इच्छा सफल व्हायची सुवर्णसंधि आल्याचें त्याला वाटलें. मृदु आवाजांत तो म्हणाला, " आमच्याविरुद्ध एक कफ्रस्यांचा ठेकेदार संघटना करतो आहे ! माझगांवला..."

माझगांवच्या शिकारीची पूर्वतयारी करून रामशरण त्या गुहेबाहेर पडला. बाहेर आल्यावर त्याला बरें वाटलें, मोकळेमोकळें वाटलें, माणसांत आल्यासारखें वाटलें. माणसांत ! रामशरणनें सभोंवार पाहिलें तों असंख्य लोक घाईगर्दीनें घरोघरीं चालले असल्याचें त्याला दिसलें. संध्याकाळ झपाट्यानें होत होती अन् सारेजण अंधार पडण्यापूर्वी घरीं जायची धावपळ करीत होते. रामशरणला एकदम आपल्या कामाची आठवण झाली. दादरच्या कापडवाल्याला कापायचें होतेंच अजून ! आता तो आला असणार ! खेरीज माझगांवचें काम ! आधीं कुठें जावें ? आधीं कुणाला संपवावें ? कापडवाल्याला कीं कफ्रशीवाल्याला ? हिंदूला कीं मुसलमानाला ?

रामशरणच्या मनांत विलक्षण गोंधळ माजला. त्याचें पाऊल पुढे पडेना. कमरेच्या चाकूना स्पर्श धडपणें होईना ! दोन्ही खिशांतल्या मोबदल्याच्या रकमा जडजड वाटूं लागल्या. तशांत उसनें अवसान आणण्यासाठीं तो मेंढरांप्रमाणें धावणाऱ्या माणसाकडे खुनी नजरेनें पाहण्याचा यत्न करूं लागला. पण त्याला माणसें दिसेनात ! त्यांच्या पाटी तर मुळींच दिसेनात ! सर्वत्र नुसते केविलवाणे चेहरेच त्याला दिसूं लागले ! चेहरे. पाटी नसलेले, हातपाय नसलेले, जातपात नसलेले, नुसते चेहरे...

रामशरण पुरा बावरून गेला. कधीं नाहीं ती धडपड त्याच्या दगडी छातीच्या आत सुरूं झाली. कुठल्याही संकटांत, आवेशांत अगर अपयशांत अशी धडधड त्याला भासली नव्हती. आपण घाबरलों तर नाहीं ? आपण...? पण त्याला आपण कोण हेच उमगेनासें झाले ? रामशरण कीं रझाक ? हिंदु कीं मुसलमान ?

रामशरणनें खूप आठवण करायचा यत्न केला. पण त्याला आपली जन्मकहाणी धडपणें आठवेना. अगदीं लहानपणीं भिकाऱ्यांच्या एका माळेंत; मग हॉटेलांत पोऱ्या म्हणून; नंतर एका वेश्येच्या घरीं नोकर; तारुण्यांतील बराच काळ तुरुंगांत...आपली जात काय ? आपण कोण ?... कुणी नाहीं ! फक्त एक—माणूस !

आपण माणूस आहोंत हा शोध लागल्यानें तो मनस्वी खूष झाला ! तळहातांना आलेला घाम पुसून त्यानें केसांचीं झुलपें मागें सारली अन् घसा खाकरून तो शांत नजरेनें सभोंवार पाहत राहिला. अंधार पडला होता. माणसांची घाई अधिकच वाढली होती. त्या सर्व लोकांसारखा तोहि माणूस होता... हिंदु नव्हता, मुसलमान नव्हता, पुढारी तर नव्हताच नव्हता !

हळूहळू रस्त्यावरची रहदारी संपुष्टांत आली. उरलींसुरलीं प्रकाशकिरणें अदृश्य झालीं. सर्वत्र सामसूम होऊं लागलें. परंतु तो तसाच रस्त्याच्या कडेला अवघडून उभा होता. शून्यपणें विड्या फुंकीत तासन् तास खडें राहणें त्याला ठाऊक होतें; पण तोंडांत बोट घालून एक खोल प्रश्न सोडवीत तो आज प्रथमच उभा होता. कुठे तरी वेळ काढीत, अचकटविचकट बोलत अन् गझ्झलकवाल्या ऐकत राहायची त्याला सवय होती; पण स्वतःला विसरून असें मेंदूला शीण देणें त्याला अगदीं नवीन होतें. कापडवाला घरीं येऊन जेवायलाहि बसला असेल...माझगांवचा माणूस दुकान बंद करून केव्हांच गेला असेल. पण हा...

त्याचे डोळे एकाएकीं चमकले ! शुष्क ओठ अचानक विलग झाले अन् तो नकळत जागचा हालला. त्याला पुरा उलगडा झाला होता. एकूण हा दंगा असा आहे ! श्रीमंतांनीं पुढारी व्हायचें, पुढाऱ्यांनीं गुंड बनायचें, अन् गुंडांनीं गरिबांची कत्तल करून श्रीमतांचीं आसनें बळकट करायचीं ! श्रीमंतानीं नामानिराळें राहायचें अन् गरिबांना जातींच्या चिठ्ठ्या चिकटवायच्या...बदला घ्यायचा, दुही टिकवायची, दारिद्र्य वाढवायचें...ह्याचें नांव दंगा ! काय दुनिया आहे !

एक मोठा कट कळल्यासारखा त्याचा चेहरा आनंदित झाला. पण लगेच तो गोंधळल्यासारखें करूं लागला अन् शेवटीं त्याचें तोंड काळेंठिक्कर पडलें. आपण...आपण अशल्या कटांत...

तेवढयांत मागून चाहूल आली. तो वळून पाहणार तोंच सुऱ्याचें तीक्ष्ण पातें त्याच्या पाठींत घुसलें. तो तडफडत खालीं पडला! फाटलेल्या नजरेनें त्यानें पाहिलें. हरनाम पळत होता! साल्यानें अखेर वैर साधलें!...धुळींत तो आंचके देऊं लागला. प्राण डोळ्यांत गोळा झाले होते अन् त्या भरलेल्या दृष्टीनें तो भोंवतालीं पाहायचा यत्न करीत होता. पण त्याला जवळपास कुणीच दिसेना! हळूहळू चहाचा ग्लास नि नानकटाई घेऊन उभी असलेली जयतुनची आकृति दिसली. पानानें रंगलेलें तिचें तोंड अगदीं जवळ येऊं लागलें. विडयामुळें तिचा मुखडा अगदीं लाल झाला होता...रक्तासारखा लाल...! अन् मग तो लाल रंग काळवंडून जात अखेर...अंधार अंधार होत गेला!

× × ×

रक्ताच्या थारोळ्यांत पडलेलें त्याचें प्रेत प्रथम एका हॉटेलच्या पोऱ्यानें पाहिलें. त्यानें धांवत जाऊन मालकाला सांगितलें. मालक उठला अन् त्याच्याबरोबर हॉटेलमधील गिऱ्हाइकेंहि आलीं. आजूबाजूच्या घरांतून लोक डोकावूं लागले. त्यांतच एक पोलीस होता. त्यानें प्रेत ताब्यांत घेतलें. लॉटरीचीं दोन तिकिटें, एक तीक्ष्ण हत्यार अन् दोन्ही खिशांत नोटांचीं बंडलें!...मोठा इरसाल गुंड असावा असें पोलिसांचें मत पडलें! हा सारा सोहळा पाहणारी समोरच्या गच्चींतली स्त्री घरांत गेली. तिनें फोनवरून कामावर असलेल्या नवऱ्याला ही बातमी कळवली. लगेच ती बातमी इतर कारकुनांच्या कानाकानांतून घुसली अन् मग सर्वत्र वेगानें पसरूं लागली. आणि थोडयाच अवधींत जातीय दंगलीची ही वार्ता वर्तमानपत्रांच्या असंख्य प्रतींतून उमटूं लागली!

# थक्ककथा

# १०

दिल्लीहून नुकत्याच सुटलेल्या पेशावर एक्स्प्रेसमधील इंटरचा डब्बा.

डब्बा सारा दोन बाकांचा होता; पण वीसएक माणसें खेटून खेंचून बसलीं होतीं. त्यांतले बहुतेक मारवाडी असून ते कुठल्याशा लग्नाला निघाले होते. सामानाचीं गांठोडीं इकडेतिकडे सरकावीत ते सारखा गउका करीत होते. कोंपऱ्यांतील खिडकीजवळ एक पेशावरी पठाण गुडगुडी ओढीत होता. त्याच्याच पायाशीं, खालीं एक म्हातारी बसली होती अन् ती सारखी खोकत होती. वरच्या दोन फळ्यांपैकीं एक सामानानें पुरी भरली होती. दुसरीवर एक खाकी रंगरूट आडवा झाला होता. माणसांनीं नि सामानानें व्यापून जी जागा शिल्लक उरली होती तेथें चिलटें सारखीं घोंघावत होतीं. हिंदी जनांच्या आयुष्ययात्रेचें जें धांवतें प्रतीक कुठल्याही रेल्वेच्या प्रवासांत दिसतें तें इथेंही दिसत होतें.

दाराजवळच्या अडगळीच्या जागेंत शावक पटेल उघडून बसला होता.

डब्याबाहेर उदासवाणा अंधार पसरलेला होता. मध्येंच एखाद्या सैनिकांच्या छावणींतून उजेड येई नि त्या प्रकाशांत मेंढरांसारखे शिपाई नि

हत्तींसारखे रणगाडे दृष्टीस पडत. आजूबाजूचे तुरळक पण मोठाले वृक्ष खेडुतांच्या रामलीलेंतील रावणाची आठवण करून देत. मधूनच शेजारच्या रुळावर काम करणारे अनेक मजूर दिसत. वेगानें पळणाऱ्या गाडींतून जिकडेतिकडे असंख्य मोडक्या मशिदी दिसत. हिंदी जीविताचीं ठायींठायीं विखुरलेलीं दृश्यें ह्या धांवत्या डब्यांतूनही दिसत होतीं.

आजूबाजूला खिन्न वातावरण पसरलें होतें; पण शावक पटेलला त्याचें कांहीं वाटत नव्हतें. त्या अपुऱ्या जागेवर तो आनंदानें बसला होता. छोटी बॅग त्यानें मांडीवर घेतली होती नि तीवर हात ठेवून तो शांतपणें बसला होता. डब्यांतल्या गर्दीकडे त्यानें पाठ केली होती नि डब्याबाहेर दूर हेलकावणाऱ्या क्षितिजावर तो निराळींच दृश्यें पाहत होता. गाडी आग्रा, मथुरा, झांशीकडे झेप घेत होती. शावक पटेलचें मन मात्र दिल्लींतील कागद-नियंत्रण कचेरींत घिरट्या घालीत होतें.

कागद-नियंत्रणाच्या कचेरींत शावक पटेल गेला होता तो भीतभीतच. युद्धजन्य परिस्थितीमुळें कागदाचें कांटेकोर नियंत्रण झालेलें. तशांत उरला-सुरला कागद युद्धकार्याला पुरवला जात होता. शावकसारख्या नव्या प्रकाशकाला कोण विचारणार ? अधिक कागद मिळावा म्हणून अर्ज नि वशिले ह्यांनीं तिथला अधिकारी अगदींच जेरीस आला होता. अर्जांच्या कागदांचीं भेंडोळीं पाहून आपलें नियंत्रण अपुरें होत आहे असें त्याला वाटत होतें नि कुणी भेटावयास आलें तर जिभेवर कुठलेंही नियंत्रण न ठेवतां तो त्यांना बेसुमार बोलत असे.

शावकची अशीच संभावना झाली असती. पण त्याचें दैव बलवत्तर होतें. त्या अधिकाऱ्यास युद्धोत्तर पुनर्घटनेच्या खात्यांत वरची नोकरी मिळाल्याची बातमी समजली होती नि त्यामुळें तो खुशींत होता. त्याच वेळेला शावक भेटीला गेला. अधिकाऱ्याची मनःस्थिति प्रसन्न असल्यानें त्याने शावकशीं खूप गप्पा मारल्या. शावकला अधिक कागद हवा होता तो सटरफटर पुस्तकें प्रसिद्ध करण्यासाठीं नाहीं. युद्धानंतर जगांत ज्या नव्या घडामोडी होणार होत्या, जे नवे विचार फैलावणार होते, त्या सर्व गोष्टीं-संबंधी सर्वांना समजेल अशा लहान लहान पुस्तिका त्याला प्रसिद्ध

करावयाच्या होत्या. आर्थिक, सामाजिक, राजकीय-अनेक महत्त्वाच्या विषयांवर तो तज्ज्ञांकडून पुस्तकें लिहून घेणार होता. अन् त्यांचा ताबडतोब चौफेर प्रसार करणें मनुष्यजातीच्या हिताच्या दृष्टीनें अगत्याचें होतें. शावकनें आपली योजना नीट समजावून सांगितली. युद्धोत्तर पुनर्रचनेचें महत्त्व त्या अधिकाऱ्याला आधींच पटलें होतें. शावकला कागद मिळाला.

दिल्लीच्या दोनचार दिवसांच्या मुक्कामांत शावक स्वस्थ बसला नाहीं. अनेक विद्वानांना भेटून तो पुस्तकांची जुळवाजुळव करूं लागला. व्हाइस-रॉयच्या कार्यकारी मंडळांतील एका सभासदानें त्याला एक पुस्तक लिहून द्यायचें कबूल केलें. हिंदुस्थानच्या भावी घटनेंत त्यांचे विचार मार्गदर्शक होणार होते. सर भटनागरच्या संशोधनशाळेंतील एका शास्त्रज्ञानें शास्त्रीय शोधांसंबंधीं लिहायला सुरुवातही केली. मरीना हॉटेलमध्यें त्याला सैन्यांतील एक डॉक्टर भेटला. प्लास्टिक सर्जरीसंबंधीं त्यानें रोमहर्षक सत्यकथा सांगितल्या. त्याची मुलाखत पुस्तकरूपानें तयार होत होती. व्यंगचित्रकार शंकर युद्धानंतरच्या जगाचीं कांहीं व्यंगचित्रेंही काढून देईन म्हणाला. दिल्लीलाच शावकचें निम्में काम झालें. योजलेलीं इतर अनेक पुस्तकें कुणाकडून कशीं लिहून घ्यायचीं हें मुक्रर करून शावक दिल्लीहून परतला.

ह्या साऱ्या घडामोडी शावकला डब्यांतून दूर हेलकावणाऱ्या क्षितिजाजवळ दिसत होत्या. त्या गोड दृश्यांच्या गुंगीनें त्याचा लवकरच डोळा लागला.

शावक पुन्हां जागा झाला तो खडबडूनच !—कुठल्याशा स्टेशनवर थांबलेली गाडी सुरू झाली होती; त्या गडबडीनें शावकची झोंपमोड झाली. स्वप्नसृष्टींत दिसणारें जग नाहींसें झालें. बाहेर किर्र्र अंधार पसरला होता. आंत डब्यांत—

शावकच्या शेजारीं इतका वेळ बसलेला इसम उठून गेला होता अन् त्या जागीं एक नवाच मनुष्य येऊन बसला होता !

शावकनें त्या माणसाला नीट निरखून पाहिलें. चांगला उण्यापुऱ्या उंचीचा, धिप्पाड होता तो. साठीच्या घरांतला असावा. रंगावरून अन् चेहऱ्यावरून युरोपिअन वाटत होता. फ्रेंच तर नक्की नाहीं. इतालियनही नाहीं. झेक, पोल, स्विस...

शावकच्या डोक्यांत एक विचार झर्कन् चमकला. वंशशास्त्रावर एक पुस्तक तयार करून, त्यांतला कांहीं भाग ह्या निर्वासित गृहस्थाकडून...

त्या इसमाची ओळख कशी करावी ह्याचा तो विचार करूं लागला.

बराच वेळ गेला. शावकची सारखी चुळबूळ सुरू झाली होती. तो इसम मात्र हातांची घडी घालून स्वस्थ बसला होता. थोडया वेळानें तो एकाएकीं शावककडे वळला व म्हणाला, " कृपा करून काडयाची पेटी असल्यास देतां कां ? मला पाइप पेटवायचा आहे."

शावक खिन्न मुद्रा करून म्हणाला, " माफ करा ! मजजवळ नाहीं. पण त्या कोंपऱ्यांतल्या गृहस्थाकडून आणून देतों."

तो गृहस्थ कांहीं बोलायच्या आंत शावक त्या माणसाकडे गेला अन पेटी घेऊन परतला. त्या इसमाला पेटी देत तो म्हणाला, " मी पारसी आहें. पारसी लोकांना धूम्रपान वर्ज्य आहे."

पाइप पेटवीत तो इसम म्हणाला, " मला ठाऊक आहे."

शावकला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, " आपण बरींच वर्षे हिंदुस्थानांत आहांत ? "

" जवळ जवळ चाळीस वर्षे."

शावक चकित झाला. त्यानें म्हटलें, " पोल...झेक ? "

" नाहीं. माझी आई जर्मन होती; बाप रशियन..."

शावकचें कुतूहल कमालीचें वाढलें. त्यानें अधीरतेनें विचारलें, " हिंदुस्थानांत कुठं राहतां ? "

" तसले कांहीं प्रश्न विचारूं नका." त्या गृहस्थानें शांतपणें उत्तर दिलें.

शावक उठला नि त्यानें काडयाची पेटी पोंचवली.

पुन्हां कांहीं वेळ गेला. शावकला स्वस्थ बसवेना. त्या गृहस्थाशीं कशी लगट करावी, दोस्ती जमवावी हें समजेना ! अखेर त्याने मांडीवरील बॅग अन् आपली 'युद्धोत्तर जग' ह्या पुस्तकमालेची माहिती त्या गृहस्थाला सांगायला सुरुवात केली.

शावकच्या मैत्रीचा त्या इसमानें अव्हेर केला नाहीं. शावकचें बोलणें तो ऐकत होता. परंतु त्याला त्यांत विशेष स्वारस्य वाटत नव्हतेसें त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. पाइपचा आस्वाद घेत तो निर्विकारपणें बसला होता. शावकच्या लक्षांत ती गोष्ट लवकरच आली. तो म्हणाला, " आपल्याला एकंदर योजनेंत कांहीं दोष आढळतात कां ? "

त्या इसमानें तोंडांतला पाइप काढला अन् तो म्हणाला, " छे छे ! खरं म्हणजे मला ह्यातलं कांहीं समजत नाहीं."

त्यानें तोंडांत पाइप परत ढकलला. जास्त बोलण्याची त्याची इच्छा दिसत नव्हती शावकनें विचारलें. " असं कसं ? समजा, हीं सर्व पुस्तकं प्रसिद्ध झाल्यावर तुम्हाला भेट म्हणून पाठविलीं, तर तो तुम्हाला ज्ञानकोश वाटेल कीं नाहीं ? त्यापासून तुमच्या ज्ञानांत भर पडेल कीं नाहीं ? "

" भर ? " त्या गृहस्थानें हंसून म्हटलें.

शावकला तो आवाज हेटाळणीचा वाटला. घाईनें तो म्हणाला, "गांधीवाद, साम्यवाद, ईश्वरवाद इत्यादि ही पहिली ग्रंथमाला. वर्णभेद, वंशशास्त्र ह्यांवर हीं दुसरीं पुस्तकं. वैद्यकशास्त्र, यंत्रशास्त्र ह्यांचं भवितव्य..."

तो इसम तोंडांतून पाइप काढून जोरजोरानें हंसूं लागला. त्याचें हंसणें आवरेना. शावकला जरा राग आला. त्यानें कागद बॅगेंत कोंबले नि तो खिडकीबाहेर पाहूं लागला.

" माफ करा ! " तो गृहस्थ एकदम आर्जवानें उद्गारला, " तुमचा अपमान करायचा माझा उद्देश नव्हता. पण...पण—"

तो गृहस्थ एकाएकीं गप्प झाला. शावकला सारेंच आश्चर्य वाटत होतें. त्यानें विचारलें, " पण काय ? "

तो इसम अडखळत म्हणाला, " पण मला हे वाद अन् हे शोध सारे बालिश वाटतात ! माझे शोध..."

तो इसम पुन्हा गप्प झाला. आपण कांहीं तरी बोलून गेलों असें वाटल्यासारखी त्याची मुद्रा झाली. क्षणमात्र त्यानें अस्वस्थपणें हालचाल केली. मग एकदम तो शावककडे वळून म्हणाला, " हो, माझे शोध ! मीं तरी कुणाजवळ बोलायचं ? दूर अन् एकांतांत वर्षोनुवर्षं संशोधन करीत आयुष्य

काढतों आहें मी ! जरा चार क्षण कुणाजवळ तरी मोकळेपणानं स्वतःच्या यशाबद्दल न् बेताबद्दल बोललं तर त्यांत वाईट काय ? ”

शावक म्हणाला, “ खरं आहे ! आपल्या मनांतल्या गोष्टी दुसऱ्याजवळ सांगितल्यानंच...सांगा मला तुमच्या संशोधनाबद्दल.”

“ पण ह्याची कुठं वाच्यता करायची नाहीं. पुस्तकं वगैरे छापायचीं नाहींत...”

शावकनें कबूल केलें. त्या इसमानें पाइप रिता करून खिशांत ठेवला अन् दूरवर पाहत थोड्या वेळानें तो सांगूं लागला—“ जगाची घडी व्यवस्थित बसून मानवजातीला सर्व सुखं सारख्या प्रमाणांत मिळावीं हा तुमचा उद्देश. म्हणून तुम्ही सर्व गोष्टींवर श्रम करून त्यांना मानवांचे गुलाब बनवूं पाहत आहां ! माझे प्रयोग, माझं ध्येय ह्याहून निराळं आहे. मी खुद्द माणसावरच प्रयोग करीत आहे.”

“ म्हणजे ? ”

“ उदाहरणार्थ—एक प्रसिद्ध प्रयोग सांगतों. कोल्किसीन नांवाचं एक विषारी औषध आहे. त्याच्या अंगीं एक अचाट गुण एका शास्त्रज्ञाला आढळला आहे. त्यानं हें कोल्किसीन वनस्पतीच्या उगवणाऱ्या बियांना नि कोंबांना फासलं. आश्चर्याची गोष्ट अशी, कीं तें झाड वाढलं तें राक्षसासारखंच ! त्याचा आकार दुप्पट झाला, पानं मोठीं झालीं, फुलंन् फळंही मोठालीं झालीं...”

शावकनें सरकून म्हटलें, “ खरं ? ”

“ खरं म्हणजे ? माझा शोध नाहीं हा. ब्लॅकस्ली नांवाच्या अमेरिकनाचा शोध आहे हा. गंमत काय असते कीं—वनस्पति काय अगर जनावरं काय—त्यांची शरीरं असंख्य, सूक्ष्म डबीसारख्या पेशींचीं असतात. शरीराची वाढ व्हायची म्हणजे ह्या पेशी मोठ्या होऊन, विभागून संख्येनं वाढत जायच्या. आतां वाढणाऱ्या वनस्पतींना—म्हणजे रुजलेल्या बियांना अगर कोंबांना—हें कोल्किसीन लावलं तर पेशी विभागतच नाहींत; पण संख्या जरी वाढली नाहीं, तरी पेशीचा आकार मात्र मोठा होत जातोच. म्हणजेच शरीरं अवाढव्य आकाराचीं होतात.”

" फारच महत्त्वाचा शोध आहे हा. "

" महत्त्वाचा खराच ! कोल्किसीनच्या साहाय्यानं फुलझाडं, फळझाडं अन् इतर उपयुक्त झाडं अवाढव्य करण्याचे प्रयोग सध्या जगभर सुरू आहेत. मी अशाच प्रकारचं एक औषध तयार करीत आहें अन् तें मनुष्यावर वापरून पाहणार आहें."

शावकनं चकित होऊन म्हटलं, " म्हणजे ? "

" म्हणजे कोल्किसीनसारखेच प्रयोग मी मनुष्यजातीवर करीत आहें. कोल्किसीनसारखं द्रव वाढत्या गर्भाला जर पुरवलं, तर पेशी विभागून निरनिराळया अवयवांची वाढ न होतां, पेशी नुसत्याच मोठया होऊन त्यामुळं मोठाले अवयव तयार होतील. अर्थात् नवीन होणारं मूल जवळजवळ दुप्पट आकाराचं होईल.

शावक हसून म्हणाला, " केवढं आश्चर्य ! गर्भाला एक इंजेक्शन दिलं कीं दुप्पट आकाराचा जीव ! "

" अर्थात् तें तितकं सोपंहि नाहीं. पण ही गोष्ट अगदीं शक्य आहे. असाच दुसरा प्रयोग सांगतों. "

" सांगा, सांगा ! " शावकनें मांडीवरील बॅग खालीं ठेवली नि तो अधीरतेनें ऐकूं लागला.

" लायसेंको नांवाच्या रशियन वनस्पतितज्ज्ञानं असाच एक क्रांतिकारक शोध लावला आहे. त्याच्या मतें वनस्पतीची पूर्ण वाढ व्हायला ठराविक उजेड, पाणी, ऊष्णतामान इत्यादि गोष्टी लागतात अन् ह्या गोष्टी एकामागून एक अशा योग्य प्रमाणांत पोंचवल्या म्हणजे वाढ संपूर्ण होते. निसर्गतः वाढणाऱ्या वनस्पतींना ह्या गोष्टी मागंपुढं मिळत असतात. म्हणून त्यांना पक्व व्हायला वेळ लागतो. बीजावस्थेंतच ह्या गोष्टी योग्य तऱ्हेनं नीट पुरवल्या तर असा वेळ लागायचं कारण नाहीं. लायसेंकोनं गव्हाच्या बियांना अशा गोष्टी पुरवून मग त्या बिया पेरल्या. अर्थात् तीं झाडं चटकन् वाढून त्यांना फुलं आलीं."

शावकनें विचारलें, " ह्याहि शोधाचा तुम्ही मनुष्यावर प्रयोग करून पाहत आहां ? "

तो इसम हंसून म्हणाला, " अर्थात्! माणसाची वाढ संपूर्ण होऊन तो कार्यक्षम व्हायला निष्कारण वेळ लागतो असं माझं मत आहे. हाडं टणक व कणखर व्हायचीं, स्नायु मजबूत व्हायचे, इंद्रियांवर ताबा यायचा ह्या गोष्टींत बरींच वर्षं निष्कारण खर्च होतात. बालपणाचीं सारीं वर्षं तर बोलायला शिकायचं, चालायला शिकायचं, खायला शिकायचं, ह्यांतच फुकट जातात. हीं वर्षं वांचवलीं तर मानवजातीचा केवढा फायदा होईल! लायसेंकोनं वनस्पतीच्या वाढीच्या अवस्था शोधून काढल्या, त्याप्रमाणं मला मनुष्याच्या वाढीस लागणाऱ्या अवस्थांचं संपूर्ण ज्ञान झालं तर काय बहार होईल! मग ह्या सर्व अवस्था एकामागून एक गर्भावस्थेंतच पुरवतां येतील. मग जें मूल होईल तें जन्मल्यापासूनच स्वतंत्रपणानं जगेल, बोलेल, चालेल! कुठल्याहि प्रकारें परावलंबी राहणार नाही. "

शावकला काय बोलावें तें सुचेना. आश्चर्य आणि आनंद ह्यांनीं तो फुलून निघाला होता.

त्या इसमानें खिशांतून पाइप काढला व तो तंबाखू भरीत म्हणाला, " हे दोन शोध मानवजातीवर यशस्वी झाले तर केवढी कमालीची क्रांति होईल ! कोल्किसीनसारख्या औषधानं माणसं अवाढव्य होतील, अन् नुसतींच आकारानं वाढतील असं नाहीं, तर त्यांचे गुणहि दुप्पट होतील. सुंदर स्त्री अधिक सुंदर होईल, गोड गळ्याचा गवई दुप्पट गोडव्यानं गाईल. हुषार इसम जास्तच हुषार होईल. "

पाइप भरून झाल्यावर त्यानें तो पेटवला अन् एक झुरका घेऊन तो पुढें म्हणाला, " वाढीच्या अवस्था सांपडल्या तर असाच बदल होईल. मनुष्य जन्मल्याबरोबर आपल्या कार्यामागं, ध्येयामागं लागेल. औषधानं त्याचं शरीर मोठं झालं असणार-त्याचे गुणहि दुप्पट झाले असणार. ह्या अवस्थांच्या उपचारानं त्याच्या शरीराचा नि गुणांचा अल्पावधींत पूर्ण विकास होऊन तो तात्काळ पूर्ण पुरुष होईल. "

पाइपचे दोन मनसोक्त झुरके मारून तो इसम लगेच म्हणाला, " युद्धाच्या मनःस्थितींत असणाऱ्या तुम्हां लोकांना एक उदाहरण दिलं कीं पटेल. समजा, सोव्हियटमध्यें एक लाख गर्भिणी स्त्रिया आहेत. गर्भाला हें

औषध अन् ह्या अवस्था पुरवल्या तर अल्पावधींतच लाख एक सैनिक लाल फौजेंत दाखल होऊं शकतील ! ”

“ काय म्हणतां ! ” शावक पटेलनें थक्क होऊन म्हटले. त्याच्या डोक्यांत ह्या अफाट शोधासंबंधींच्या नाना कल्पना घोळ घालूं लागल्या. थोडया वेळानें त्यानें हलक्या सुरात विचारलें, “ हें खरंच शक्य आहे ? ”

धुराचे लोट सोडीत तो म्हणाला, “ हें कां शक्य होऊं नये ? रक्तदान करता येतं, नव्या ग्रंथी चिकटवता येतात–मग ह्यांत काय अशक्य आहे ? ह्याहूनहि अधिक अवघड प्रयोग मीं केले आहेत. ”

शावक थक्क होऊन त्याच्याकडे नुसता पाहत होता. बराच वेळ धूम्रपान केल्यानंतर तो इसम म्हणाला, “ पुरुषाचा शुक्रजंतु एका ठराविक ऊष्णतामान व ठराविक रसायनात ठेवला, तर तो शंभर वर्षं जगूं शकतो हें आतां सिद्ध झालं आहे ! ह्या ऊष्णतामानाच्या नि रसायनाच्या आंत शुक्रजंतु सोडलेल्या इंजेक्शनसारख्या नळया बनवायच्या–”

“ आणि ? ”

“ आणि काय ? जनावरांच्या बाबतींत कृत्रिम रीत्या गर्भधारणा करतात हें तुम्हांला ठाऊक असेल. कुठल्याहि नराचं वीर्य सांठवतात व कुठल्याहि गांवीं नराच्या मदतीविना तें वापरलं जातं. अशा रीतीनं जनावरांत प्रजोत्पादन केलेलं आहे. तसंच मानवात शक्य करायचं ! ”

“ म्हणजे ? ”

“ म्हणजे विशेष कांहीं नाहीं. कोणी एक स्त्री बाजारांत जाते. ट्यूब खरेदी करते. घरीं जाऊन ती तें इंजेक्शन घेते. कांहीं दिवसांनीं तिला मूल होतं. तिला हवं असेल तर ती खास डॉक्टरकडे जाऊन गर्भाला दुप्पट शरीर होणारं औषध आणि वाढीच्या सर्व अवस्थांची ट्रीटमेंट घेऊन येते. तिचं अपत्य लवकर जन्मतं नि तें लवकरच पूर्ण वाढून स्वतंत्रहि होतं. आतां ही बाई दिल्लीची नि तो पुरुष पुण्याचा असला तरी चालतो. कुणाहि स्त्रीला हा फायदा मिळेल ! ”

“ अरे बाप रे ! ” शावक मागें सरकून म्हणाला. त्यानें जें ऐकलें होतें तें केवढें नवीन होतें, चमत्कारिक होतें, थक्क करून सोडणारें होतें ! तो नुसता वेडयासारखा त्या इसमाकडे पाहात राहिला.

दूर पाहात तो इसम म्हणाला, "प्रजोत्पादन, गर्भधारणा इत्यादि गोष्टींवर माणसाचं पूर्ण नियंत्रण असल्याखेरीज बरेचसे प्रश्न सुटणार नाहींत. गर्भसंभव स्वाधीनचा नसतो; त्यांत व त्यानंतरच्या अपत्यसंगोपनांत वेळ जातो. म्हणूनच सुंदर नि कलोपासक स्त्रिया मुलं होऊं देत नाहींत. ह्या गुणी मातांचा पुढील पिढीस कांहींच फायदा होत नाहीं. शूर पुरुष तर अकालींच युद्धांत मरतात. तत्त्वज्ञानी नि शास्त्रज्ञ हे देखील संसाराची दगदग टाळतात. त्यांना मुलं झालीं तर पुढील पिढी अधिक जोमदार होईल. पण बहुतेकांचा निर्वंश होतो. त्यांच्या शुक्रजंतूंच्या ट्यूब्स विकल्या तर केवढा फायदा होईल!"

तो इसम बोलणें थांबवून पाइप ओढीत राहिला. शावकची वाचाच बंद झाली होती! बराच वेळ असाच गेला. मग तो इसम म्हणाला, "ज्या प्रयोगासाठीं मीं आज सामान आणायला गेलों होतों, तो तर ह्या सर्वांवर कळस करणारा आहे."

शावकनें मोठे डोळे अन् प्रश्नांकित मुद्रा केली नि तो त्या इसमाचे ते विलक्षण शब्द हलत्या हृदयानें ऐकूं लागला.

"शुक्रजंतूप्रमाणं स्त्रीचं अंडंही ठराविक उष्णतामानांत नि ठराविक रसायनांत जगवतां आलं पाहिजे! गर्भाशयांतून काढून तें कृत्रिम रीत्या टिकविणं साध्य केलं पाहिजे. नंतर अशा अंड्यांचा शुक्रजंतूशी संयोग घडवून आणून गर्भ तयार करतां आला पाहिजे. हा गर्भ एखाद्या बाटलींत अगर खास भांड्यांत तयार करतां येणं अगदीं शक्य आहे. गर्भ तयार झाला कीं गर्भाशयांत असणारीं सर्व द्रव्यं व सोयी बाटलींत कृत्रिमपणें पुरवतां येतील. जणूं एक गर्भाशयच बाहेर तयार करायचं! हा जीव असाच बाटलींत वाढेल अन् स्त्री नि पुरुष ह्यांच्या विशेष मदतीविना—विशेषतः स्त्रीच्या गैरहजेरींत—मुलं प्रयोगशाळेंत तयार करतां येतील!"

शावकचें हृदय जड होऊं लागलें. त्याच्या अंगाला कांपरें भरल्यासारखें वाटलें. डोळ्यांसमोर अनेक चित्रें दिसूं लागलीं.

तो इसम शावकच्या खांद्यावर हात ठेवीत म्हणाला, "आज वीस-पंचवीस वर्षं मी हे प्रयोग करीत असून त्यांत थोडंफार यशही मीं मिळवलं आहे!

माझा उद्देश एकच आहे. मानवांचा उद्धार करणारे अनेक महर्षि होऊन गेले खरे; पण मानवी स्वभावांच्या छटा त्यांना बदलतां आल्या नाहींत. उत्पत्ति, स्थिति अन् लय ह्यांतील परावलंबित्व काढून टाकून हा बदल मला घडवून आणायचा आहे. मला राग, लोभ, प्रेम, मत्सर, वासना, लालसा— ह्या मानवी छटाच नष्ट करायच्या आहेत ! ”

शावक पांढरा फटफटीत पडला. त्यानें खोल आवाजांत आपल्या बॅगकडे पाहून म्हटलें, “ मग जगायचं कशाला ? ह्या साऱ्या गोष्टींचा अर्थ तरी काय ? ”

“ हा वेडयासारखा प्रश्न आहे ! क्रांतिकारक शोध लागला कीं माणसाला नेहमीं वाटतं–संपली प्रगति !—आला शेवट ! पण वाट पुढं चालूंच असते. नवीं मूल्यं अज्ञातच असतात !...”

धक्का बसून गाडी थांबली. त्या इसमानें बाहेर वांकून पाहिलें आणि तो म्हणाला, “ आलंच माझं स्टेशन.”

त्यानें आपली बॅग उचलली अन् शावकला अभिवादन करून तो लग-बगीनें उतरून फलाटावरील अंधारांत नाहींसा झाला.

धक्का मारून गाडी चालू झाली अन् शावक भानावर आला. गाडी वेगानें चालू झाली. बाहेर अंधार पसरला होता. मोडक्या मशिदी, रावणा-सारखे वृक्ष, सैन्याच्या छावण्या अगदीं अंधुक दिसत होत्या. डब्यांतले सारे लोक पेंगुळले होते. मारवाडी वऱ्हाड एकमेकावर रेलून झोंपलें होतें. पठाणाची गुडगुडी बंद झाली होती. रंगरूटाचें घोरणें सुरूच होतें. डब्यांत अन् डब्याबाहेर कुठलीं तरी जुन्या काळचीं, मागासलेलीं, दृश्यें आपण पाहात आहोंतसें शावकला वाटलें.

त्यानें आपली बॅग मांडीवर घेतली, युद्धोत्तर जगाच्या प्रकाशनाची योजना बाहेर काढली, अन् त्याकडे तो करुण मुद्रेनें वेडयासारखा पाहत राहिला !

---